# पारध

[पुरुषपात्रविरहित
चार अंकी नाटक]

लेखिका

**सौ. मालती बेडेकर**

[बाळूताई खरे]

किंमत १ रुपया

- मुंबई मराठी साहित्य संघातर्फे साजरा झालेल्या तृतीय वार्षिक नाट्य-महोत्सवातर्फे झालेल्या चढाओढींत पुरुषपात्रविरहित नाटकांत ' पारध ' नाटकाला पहिलें पारितोषिक मिळालें.

- याच नाट्य-महोत्सवात त्याचा प्रयोग रविवार ता. २७-४-६३ रोजीं करण्यांत आला.

- या प्रयोगांत पुढील व्यक्तींनीं कामें केलीं.

**रमा** : सौ. सुशीला गोडसे
**मथुराबाई** : सौ. कमला दाते
**रमेची आई** : सौ. निर्मला मोकाशी
**केतकी** : सौ. सुशीला काशीकर
**केतकीची सासू** : सौ. मनोरमा फडके
**सुनंदा** : सौ. शालिनी पंडित
**जानकीबाई** : सौ. मनोरमा चाफेकर
**कला** : सौ. इंदुमती घोटीकर
**जिजा** : सौ. कमल पटवर्धन
**रखमा** : सौ. इंदुमती घोटीकर
**पुष्पा** : कुमारी अचला फडके
**दुलारी** : कुमारी माणिक साठे
**विनू** : कुमार वर्तक
**१ शेजारीण** : सौ. रत्ना करंदीकर
**२ शेजारीण** : सौ. मालिनी केतकर

- या नाट्यप्रयोगाचें दिग्दर्शन सौ. सुशीला काशीकर यांनीं केलें.

'पारध' करण्यापूर्वी—

*ही नाटिका नाट्यतंत्राकडे मुळीच लक्ष न पुरवतां केवळ स्त्री पात्रांकरवी करमणूक करण्याच्या उद्देशानें लिहिली आहे.*

—मालती बेडेकर

मनुस्मृति,
डेक्कन जिमखाना,
पुणें ४

# पात्रपरिचय

| | | |
|---|---|---|
| १ | रमा | एका वकिलाची परित्यक्ता पत्नी |
| २ | रमाची आई | |
| ३ | मथुराबाई | रमाची सासू |
| ४ | बिनू | वर्ष वयाचा रमाचा मुलगा |
| ५ | केतकी | एका वकिलाची फॅशनेबल पत्नी |
| ६ | केतकीची सासू | |
| ७ | सुनंदा | केतकीची फॅशनेबल मैत्रीण |
| ८ | कला | केतकीच्या परिचयाची स्त्री |
| ९ | दुलारी | केतकीच्या मुली |
| १० | पुष्पा | केतकीच्या मुली |
| ११ | जानकीबाई | उत्साही कार्यकर्ती |
| १२ | रखमा | रमाच्या घरची मोलकरीण |
| १३ | जिजा | केतकीच्या घरची मोलकरीण |
| १४ | शेजारणी | |
| १५ | शेजारणी | |
| १६ | शेजारणी | |
| १७ | छचोर स्त्री | |

# १

[ १ ]

रस्ता. केतकी, अप्–टु–डेट् पोषाख केलेली, रस्त्याने झपझप जात आहे. मागून ' केतकी ' ' केतकी ' अशा हांका ऐकू येतात. केतकी थांबते. मागे वळून पाहते. सुनंदा केतकीसारखीच अप्–टु–डेट्. ही केतकीची मैत्रीण आहे.

**सुनंदा :** अग एवढी वाघ मागें लागल्यासारखी कां धांवतेस ?

**केतकी :** मग काय करूं ? आज त्या रमाबाई येणार नाहींत. स्वयंपाक आहे ना गळ्यांत !

**सुनंदा :** अशा ग काय बाई रमाबाई तुझ्या ? चार दिवस येतात अन् आठ दिवस येत नाहींत. त्यापेक्षां दुसरी बाई कां नाहीं ठेवीत एकादी ?

**केतकी :** मी लाख ठेवीन ग. मिळाल्या पाहिजेत ना ? ही रमाबाई ठेवली आहे. पण तिच्या किती अटी ! ' मी स्वयंपाकीण म्हणून राहणार नाहीं ! ' ' कायम राहणार नाहीं.' 'मला कुणा परक्याच्या देखत हांक मारायची नाहीं.'

**सुनंदा :** होय ? अन् तें कां ?

**केतकी :** काय तिची भानगड आहे कुणाला ठाऊक! पण ती चोरून स्वयंपाकाला राहिली आहे असं वाटतं. तें राहूं दे. माझ्यासाठीं 'सौंदर्य-साधना' म्हणून पुस्तक आणणार होतीस, तें आणलंस का ?

**सुनंदा :** त्याच्यासाठींच तर तुझ्यामागें धांवत होतें. हे सगळे प्रयोग करून पहाण्यासारखे आहेत अं! आपण दोघी करून बघूं या ग !

**केतकी :** अग सगळं खरं. पण आतां आमच्या सासूबाई आल्या आहेत ना ? सगळं कांहीं चोरून मारून करावं लागतं.

**सुनंदा :** कां ? आपली सून सुंदर दिसली म्हणून त्यांचं रूप तर कमी नाहीं ना व्हायचं ?

**केतकी :** तसं म्हटलं तर आमच्या घरांत रूपाचं वावडंच आहे जरा. पण आतां हें मालिश, व्यायाम, चेहऱ्यांना पोटिस. कसं जमणार आहे माझं कुणाला माहीत! आधींच यांना या गोष्टी आवडत नाहींत. त्यांत सासूबाई अगदीं घरांत पहारेकऱ्यासारख्याच आल्या आहेत म्हणेनास!

**सुनंदा :** मग मी येऊं का नको ?

**केतकी :** वाः, ये कीं! करील त्याला हजार मार्ग. काय ग ? यांत लठ्ठपणा कमी कसा करावा यावर उपाय आहे का ग ? अन् माझे केस भारी जातात ग ! त्यावर आहे का ग कांहीं ?

**सुनंदा :** अग कित्ती तरी गोष्टींवर लिहिलं आहे : लठ्ठपणा कमी कसा करावा, नाक सरळ कसं करावं, चाल कशी बदलावी, पोटाचं घोंदील कमी कसं करावं, कोणचा मेक्-अप् केव्हां अन् कसा करावा—

**केतकी :** अगबाई, हो का ? काय ग पण! याच वेळीं बऱ्या त्या रमाबाई गेल्या! त्या असतांना त्यांची सुद्धां मदत होते हो मला या ब्यूटी ट्रीटमेंटमध्यें.

**सुनंदा :** म्हणजे ? त्याही करतात कीं काय मालिश ?

**केतकी :** नाहीं ग ! तशी ती साधी आहे बाई. पण आमच्या सासूबाईना दोन दोन तास बोलण्यांत गुंतवून ठेवा म्हटलं तरी ठेवतात. म्हणजे आमची ट्रीटमेंट व्हायला अडचण पडत नाहीं. आतां आज जानकीबाईंना सांगितलं पाहिजे कीं, कसंही करा पण रमाबाईंना आमच्याकडे कायम ठेवा. तसं म्हटलं तर अशी बाई मिळायची नाहीं.

**सुनंदा :** वाः! जानकीबाई म्हटलं कीं जानकीबाई ! चर्चिलचा चिरूट,

गांधीजींचा पंचा, जवाहरलालजींचं जाकीट आणि आमच्या जानकीबाईंची झोळी ! या !

[ जानकीबाई पावतीबुकावर कांहीं लिहीत लिहीत हातांत झोळी अडकवून येतात. बाई साधें पांढरें पातळ नेसलेल्या. उत्साही कार्यकर्त्या. ]

**जानकी** : कां ? वर्गणी देतां कीं काय ?

**केतकी** : आतां पुरे झाल्या तुमच्या वर्गण्या. आतां यापुढें पुरुषाला दोन लग्नं करतां यायचीं नाहींत जानकीबाई.

**जानकी** : म्हणजे ?

**सुनंदा** : आतां एकपत्नीत्वाचा कायदा झाला जानकीबाई !

**जानकी** : अरेरे !

**केतकी** : अरेर ?

**जानकी** : अहो, इतके दिवस शंभर बायका मरत असल्या तर आतां दोनशें मरतील. पुरुषानं आपल्या बायकोकडे दुर्लक्षच करायचं टरवलं कीं तो म्हणेल, 'मी दुसरं लग्न नाहीं ना करूं शकत ? मी दुसरी बाई नुसती ठेवीन !' म्हणजे झालं ! एक बायको लग्न झालं म्हणून मेली अन् दुसरी लग्न होत नाहीं म्हणून मेली !

**सुनंदा** : हें मात्र खरं हो ! मग आतां तुम्ही घटस्फोटाचा प्रचार करणार कीं काय ?

**जानकी** : अहो ! करायलाच हवा ! एकपत्नीत्वाचा कायदा आणि घटस्फो-टाचा हे दोन्ही बरोबर पास झाले तर त्यांत अर्थ. नाहींतर उलट पुरुषांचंच फावलं. पण घटस्फोटाच्या प्रचाराबरोबर आधीं मला उद्योगमंदिर काढायचं आहे. आजकाल टाकलेल्या बायकांची संख्या इतकी वाढली आहे कीं, त्यांचे पोटापाण्याचे प्रश्न सुटलेच पाहिजेत.

**केतकी** : जानकीबाई, ते प्रश्न तुम्ही मग सोडवा. पण आधीं त्या रमाबाईंना सांगा ना आमच्याकडे कायम राहायला. मी तीस रुपये देईन बघा त्यांना.

**सुनंदा** : पण इतकं गयावया करण्यापेक्षां तूंच त्यांच्या घरीं जाऊन सांग कीं ! म्हणजे त्यांनाही महत्त्व दिल्यासारखं वाटेल, अन् त्या तयार होतील.

**केतकी** : अग पण त्या कोण, काय, कुठें राहतात, कांहीं पत्ता लागत नाहीं ! आणि जानकीबाई पण त्या बाबतींत गुपचूप !

**जानकी** : अहो, असं काय करतां? अजून कांहीं 'स्वयंपाकीण' म्हणून तिच्यावर शिक्का पडला नाहीं. बिचारी चोरून मारून स्वयंपाक करते आहे. नवऱ्याच्या घरीं थारा नाहीं अन् आईच्या घरीं अठरा विश्वे दारिद्र्य! मग काय करील बिचारी? अजून तिला आशा आहे नवरा संभाळील अशी! म्हणून धरसोड करते आहे झालं!

**सुनंदा** : कुणाची बायको आहे ती?

**जानकी** : मी तुम्हांला सांगणार नाहीं. एकदां तिच्या सुदैवाचा घडा फुटला—न फुटो बिचारीचा, पण फुटलाच—तर ती किती दिवस लपून राहील? रूप, गुण कांहीं कमी आहे का तिच्यांत? तरी ही असली परवड!

**केतकी** : (अधीरतेनें) पण तिला कुठें राह्यची वेळच आली, तर मात्र माझ्याकडेच यायला सांगा बरं का? गेले सहा महिने येऊन जाऊन तिलाही आमच्या घराचं वळण पडलं आहे.

**जानकी** : (रागानें) आतां केतकीबाई! तुम्ही देवाला आळवा तिच्या नशिबासाठीं! स्वयंपाकिणीचा धंदा नको म्हणावं त्या थोरामोठ्याच्या बाईमागं लावूं!

**सुनंदा** : थोरामोठ्याची?

**जानकी** : (दुर्लक्ष करून) जातें मी. अजून जायचं आहे चार घरीं. (जाते.)

**केतकी** : (जातां जातां) जानकीबाईना भारी बाई कळवळा ज्याचा त्याचा!

[ केतकी आणि सुनंदा जातात. ]

[ २ ]

रमाबाईच्या आईच्या घराचें अंगण. रमा व तिची आई. रमा सुरूप, तरुण स्त्री. दोघींपैकीं एक—रमा—तांदूळ निवडीत आहे. तिची आई वाती करीत आहे.

**रमा** : मी मुळींच पैसे देणार नाहीं. अग, माझ्या जवळ कुठून पैसे असणार? जें काय आहे तें माझं मला माहीत. आज माझ्याबरोबरीच्या मुली

सुखानं संसार करताहेत. कुणी नोकऱ्या करताहेत. पण माझं फुटकं नशीब. मी ' शिकव ' म्हटलं तर माझं लग्न करून दिलंस. आतां त्या धाकट्या दोघींच्या लग्नाची कशाला घाई करतेस ?

**आई** : घाई नको करूं तर काय घालूं त्यांच्या पोटाला ? माझ्याच पोटांत काटे घालायची वेळ आली आहे आतां. म्हणे ' शिकव ' ! अग, शिकवायच्या गोष्टी फुकटच्या का आहेत ? शिकस्तवर तुमच्या पोटाला घालायचं अन् वर बुकं नि फी ! तुम्हां सहा बहिणींना शिकवायचं मनांत आणलं असतं, तर यांना अन् मला कर्जापायीं वेड लागून चिंध्या फाडीत रस्त्यानं हिंडावं लागलं असतं.

**रमा** : अन् न शिकवतां लग्नं केलींस तरी काय होणार आहे ? आज एकीचा नवरा मेला, म्हणून तिनं पोळपाट लाटणं घेतलं आहे. माझं लग्न केलंस तर माझी ही स्थिति ! आतां त्यांचीं लग्नं केलींस कीं, त्यांच्या दोन तऱ्हा होतील आणखी ! मिळून तशीही वेड लागायची पाळी आहेच ना ? तुम्हांला पैसे देऊन मुलींना पत्करणारे नवरे त्यांना कितपत सुख देतील ? माझ्याकडेच बघ ना ! असंच वाटोळं करायचंय का ?

**आई** : वाटोळं करायचं म्हणून का तुमचीं लग्नं केलीं ? पण मला तरी पोसतां आलं पाहिजे ना ? आणि हुंडे कोठून आणूं ? दांत पाडून सुद्धां देतां आले नसते !

**रमा** : मग ? मुलगे असते तर मुलांना नसतंस पोसलं ?

**आई** : मुलांचं वेगळं अन् मुलींचं वेगळं. मुलांच्या कमरेंत चार बोटांची चिंधी अडकवली कीं, चार घरीं भिक्षा मागायला तो मोकळा होतो. मुलीचं तसं का आहे ? ती म्हणजे तलवार. अब्रूसकट एकदां लग्न लावून द्यायचं म्हटलं म्हणजे आईबापांचे प्राण कासावीस व्हायला येतात ! कासावीस. मुलगा शिकला तर त्याचा उपयोग तरी. मुलींना मात्र शिकवायचं अन् त्या जायच्या अखेरीला लग्न करून !

**रमा** : खरं आहे बाई. इकडे ती परघरीं जायची म्हणून शिकवायचं नाहीं. आणि लग्न करून गेली कीं तिचं घर तिचंच असतं असं नाहीं. मग काय परवड विचारायची आहे ! लग्न करून पुनः बापाच्याच घरीं. अन् मग उकिरड्यावर !

**आई** : पण आतां ही रीतच आहे जगाची ! कुणी उकिरड्यावर, तर कुणी सिंहासनावर.

**रमा** : बरी आहे ही जगाची रीत! अशानं किती बायकांची धूळधाण होते हें मात्र पाह्यला येत नाहीं कुणी.

**आई** : आतां आजपर्यंत जग असंच चाललं आहे ना? आम्ही तर त्यांतून दरिद्री. मी तर म्हणतें, त्या दोघींचीं एकदां लग्नं केलीं कीं, मी, मुलगा अन् हे कसंही पाहूं.

**रमा.** : मग त्यांना विहिरींत ढकलून दे आई! लग्न कशाला करतेस? आज लग्न दिसतंय, उद्यां त्यांना पोरं झालीं म्हणजे?

**आई** : झालीं म्हंजे काय? व्हायचींच. आम्हांला नाहीं झालीं? अन् यांना काय मिळत होतं? केलाच ना आम्ही संसार?

**रमा** : आई, आतां काय सांगूं तुला?

**आई** : कांहीं सांगूं नकोस. तुझ्यापेक्षां दहावीस पावसाळे काढले आहेत मी. मला थोडे पैसे दे. मी तिला घेऊन जातें मुंबईला दाखवायला.

**रमा** : आई, खरंच नाहींत माझ्याजवळ पैसे आतां. माझं फुटकं नशीब अन् तें पोर घेऊन मी रानोमाळ हिंडणार. त्यांत तुला कुठून पैसे देऊं? अन् दिलेही असते कर्ज काढून. पण बहिणीचा गळा कापायला नाहीं देणार मी.

**आई** : मी नेहमीं का मागतें?

**रमा** : असं कां बरं म्हणतेस आई? महिन्यांतून आठ आणे, चार आणे, रुपया, काढून देतें. मला तरी असं काय मिळतं आहे? माझा भार तुझ्यावर पडतो आहे म्हणून चोरुन मारून काम करून पांच रुपये मी मिळवणार अन् त्यांतून तुला देणार. त्याखेरीज आणखीही मागितलेस तर कुठून देऊं? उद्यां आजारी पडलें तर मला घांसभर अन्न खा म्हणणार आहे का कुणी?

**आई** : मी तरी काय करणार? तुझ्या लग्नाला खर्च केले, ते पैसेसुद्धां अजून फिटले नाहींत, तोंच पुनः तूं अन् तुझं पोर घरीं आलांत! टाकलं नाहीं ना तुम्हांला? घातलंच ना खायला?

**रमा** : आतां मला लग्नांत विकूनसुद्धां मी तुझ्याच डोक्यावर कर्जाचा भार ठेवणार हें माहीत असतं तर...(रडत) आणि पुनः सगळं हें असं...हेंच पुढं वाढून ठेवलं आहे हें माहीत असतं तर मनानं पोळपाटलाटण्याची आधींच तयारी करून ठेवली असती! पण आतां स्वयंपाकीण म्हणून जातांना अंतःकरण भंगून जातं. पण तुझ्यावर भार नको म्हणूनच ना मी हें करतें!

मला कुणाचा आधार असता, तर मला ज्या घरीं वैरलंत तेथून कशाला आलें असतें तुझ्या घरीं ?

**आई** : रमा, मी तरी बोललें म्हणजे काय तुला दुखवावं म्हणून का ?

**रमा** : आई, मला सगळं ठाऊक आहे. जगांत कुणी कुणाचं नाहीं. माया, प्रेम, आदर, मान, सगळं कांहीं पैशांत मिळतं अन् पैशांनीं मिळतं. आई काय, बाप काय, भाऊ काय नि सासरचीं माणसं काय—सगळ्यांचं प्रेम पैशांवर. कष्टाला जगांत कांहीं किंमत असती, तर सासूनं अन् नवऱ्यानं पावलागणिक कां लाथाडली असती मला ? तुझ्या मनांत नसेल कदाचित् मला दुखवायचं. पण तुमच्या वागण्यांत अन् शब्दांत जें दिसलं, तेंव्हांच ठरवलं, कुणी कुणाचं नाहीं; आपलं आपण पाहिलं पाहिजे.

**आई** : हो, हें बरीक खरं. तुझंच तूं पहातेस. आतां एवढी मी तुला माझं मन सांगायला आलें, तर तूं असं धुडकावून दिलंस मला !

**रमा** : तुमचं मन ! सगळ्यांचीं मनं ! मला मात्र मन नाहीं ! घे हे पैसे. ( कनवटीचा रुपया काढून टाकते. ) वेळप्रसंग पडला तर अफू खायला पुरतील एवढेंच पैसे शिल्लक आहेत माझ्याजवळ. ते घे अन् काप तुझ्या धाकट्या दोन मुलींचा गळा. आज तीं माणसं तुला पैसे देऊन तुझ्या मुली करतील अन् उद्यां चारचार पोरं गळ्यांत अडकावून त्यांना रस्त्यावर पाठवतील, तेंव्हां मात्र येऊं नको माझ्याकडे सांगायला. अन् माझ्या बहिणींना पण माझा लग्नाचा अहेर म्हणून सांग कीं, पोळपाटलाटण्याची आतांपासून तयारी करून लग्न करा; कारण अडाणी मुलींना नवऱ्याचा आधार तुटला तर संकटांत पोळपाटलाटण्याखेरीज दुसरा आधार नाहीं !

[ जाते. बरोबर तांदुळ निवडण्यासाठीं जमवलेलें सामानही घेऊन जाते. ]

**आई** : नको बाई रुपया. जा आपला घेऊन.

[ रमा परत येत नाहीं. रमाबाईची आई रुपया उचलते व जाऊं लागते. ]

**आई** : ज्याच्या कळा त्याला माहीत. गरीब आईबापांचं म्हणजे चारी बाजूंनीं मरण ! ( जाते. )

रमाचें सासर. घराचें मागचें अंगण : रमाबाईची सासू मथुराबाई तुळशी-वृंदावनापुढें बसल्या आहेत. पूजा पुरी करून वृंदावनाभोंवतीं प्रदक्षिणा मारूं लागतात.

**मथुरा :** हें बघ रखमा, बाळासाहेब अजून उठले नसले तर त्यांना उठवूं नको.

**रखमा :** आँ ? अन् आतां घा वाजूनशानी गेल नव ? हपीसाला जानार न्हाईत जनुं ?

**मथुरा :** गेलं चुलींत हपीस. रात्रभर मेला डोळयाला डोळा नाहीं.

**रखमा :** काल शिणेमाला ग्येल व्हत जनुं ?

**मथुरा :** सिनेमाला ? हो. आमच्या घरांत चालला आहे ना सिनेमा सहा महिने ! रखमा, आज जर ती बया पुनः आली तर बंद करून घे दार. तिचं पाऊल नको घराला लागायला. तोंड पाहूं नयेसं वाटतं.

**रखमा :** आई साब, आमी नोकरमानसं. वहिनीसाहेबास्नी घरांत येऊं नका असं कसं सांगायचं ?

**मथुरा :** कोण वहिनीसाहेब ? रमा ? ती आतां वहिनीसाहेब नाहीं. मी तिची सासू नाहीं अन् बाळ तिचा नवरा नाहीं. समजलं ?

**रखमा :** पन आईसाब, तुमीच आपलं त्ये केलं तर शोभल.

**मथुरा :** इश्श ! शोभायचं ग काय त्यांत ? सांगितलेलं मुकाट्यानं ऐकायचं अन् सोडून द्यायचं. आतां चांगली खोड मोडली आहे म्हणा तिची. बहुतेक यायची नाहीं म्हणा ती. पण गांवभर दवंडी मात्र पिटीत राहिली असेल आमच्या नांवानं. कालच पहा कुणी जानकीबाई म्हणून आली होती तिचा कैवार घेऊन. काय त्या बाळासाहेबाचं डोकं उठवलं तिनं म्हणून सांगूं ! बरं, आतां दाराकडे लक्ष दे नीट.

[ रखमा केरसुणी घेऊन झाडायला लागते. इतक्यांत दोन तीन शेजारणी निरनिराळ्या बाजूंनीं दबकत कानोसा घेत येतात. ]

**१ शेजारीण :** कां ग ? वहिनी आल्या नाहींत वाटतं अलिकडे ?

[ रखमा बोलत नाहीं. ]

**२ शेजारीण** : काय ग रखमा ?

**रखमा** : (रागानें) काय व ? तुमी काय शिणेमा पायला आलांत व्हय इथं ?

**१ शेजारीण** : अजून वहिनी आल्या नाहींत वाटतं ?

**३ शेजारीण** : अहो, ऐकलं तें खरं का खोटं कुणास ठाऊक. पण बाई मी कांहीं तरीच ऐकलं.

**१ शेजारीण** : तरी पण ?

**३ शेजारीण** : त्या म्हणे कुठेशा कामाला जातात.

**रखमा** : अर द्येवा ! काय बिचारीवर पाळी आलीया !

**२ शेजारीण** : कुणाकडे हो ?

**३ शेजारीण** : तें कांहीं माहीत नाहीं. पण आपली कुणकुण आहे.

**१ शेजारीण** : अहो, मग काय करतील ? पावसानं झोडलं अन् राजानं मारलं, कुणाकडे दाद मागायची हो ?

**३ शेजारीण** : ( हळूच ) शुः ! वहिनीच आल्या वाटतं.

[ सगळ्या दरवाज्याकडे बघत राहतात. ]

**रखमा** : आँ ? अन् आतां या घरांत गेल्या कीं सासूबाई रागाला येऊन मलाच न्हाई न्हाई तें बोलूनशानी घेतील. ( गोंधळून ) आतां दार लावूनशानी टाकत्ये.

[ जाऊन दार लावते. ]

**१ शेजारीण** : आतां बिचारीला अन्नसुद्धां देणार नाहीं बरं ही सासू.

**२ शेजारीण** : मागल्या खेपेला नाहीं का ? पांच महिन्याचं पोर कमरेवर अशी बिचारी अन्नपाण्यापासून दुपारपर्यंत बसली अन् टळटळीत उन्हांत पोराला खांद्यावर घेऊन चालायला लागली.

**३ शेजारीण** : ही सासू आहे का राक्षशीण ?

[ रमा हळू हळू येते. लावलेल्या दाराशीं उभी राहते. ]

**१ शेजारीण** : च्च् च्च् च्च् ! काय ही दशा वहिनी तुमची !

[ रमा गप्प रहाते. ]

**२ शेजारीण** : मुलाला घरीं ठेवलंत वाटतं ?

[ रमा गप्प खालीं मान घालून उभी राहते. ]

**१ शेजारीण** : ( आपसांत ) आईकडे ठेवला असेल. ( रमाकडे पाहून ) का सासूबाईंनीं आणलाय नातू घरीं ? काय ग रखमा ?

**रखमा :** अरं ग्रेवा ! आतां त्यांच्याकडं तरी बघ ! कसल्या मेल्या चांभारचवकशा ! वहिनीबाय, वहिनीबाय, कशाला उन्हाच्या येतायसा ! यांना कांहीं दयामाया येनार हाये ?

**१ शेजारीण :** आपण सांगूं या मथुराबाईंना.

**२ शेजारीण :** नाहीं ग बाई ! कोण त्यांच्या तोंडीं लागणार ?

**३ शेजारीण :** तुमचीच खरडपट्टी काढतील !

[ मथुराबाई दार उघडतात.]

**मथुरा :** (रमाला दाराशीं पाहून) हं ऽ ऽ ऽ ऽ ! आलांत ? मला वाटलंच !

[ धाडकन् दार लावून पुन: आंत जातात. ]

**रखमा :** झाली र ग्रेवा घुमाया सुरवात.

[ मथुराबाई पुन: दार उघडतात. ]

**मथुरा :** रखमा, इकडे ये. ( रखमा पुढें जाते. ). धर हिचा हात अन् कंपौंडाच्या बाहेर घालवून दे. ( रखमा उभीच राहते. ) काय ग ? कान फुटले का ? मेलीं नोकर माणसं तरी पहा खाल्ल्या घरचे वासे मोजणारीं असतात ! ( रखमा उभीच असते. रमाकडे पाहून ) आतां पुरे झाले तमाशे. जाऊं दे धिंडका इथून. भिकारणी अशाच लतकोडग्या असायच्या.

**१ शेजारीण :** जाऊं द्या होमथुराकाकू.

**मथुरा :** हं ! जातं त्याला कळतं ! तुम्हां शेजारणींना बरा राहून राहून पुळका येतो. मागल्या खेपेला बरा ' वहिनी ' ' वहिनी ' करून चहा दिलात ना ? आतां जेवायला घाला. आहे ना तुम्हाला कळवळा ? मग ठेवून घ्या जन्मभर.

**२ शेजारीण :** ( पहिल्या शेजारणीचा पदर ओढून हळूच ) नका हिच्या तोंडीं लागूं बाई तुम्ही उगीच.

[ तिघी हळू हळू जायच्या मार्गाला लागतात. ]

**मथुरा :** ही बाई घरांत आल्या दिवसापासून आमच्या घरांत एक गोष्ट बरी झाली असेल तर शपथ ! बाळासाहेबांची तर नुसती पत्रावळ केली या बाईनं ! केवढा धडधाकड मुलगा होता माझा ! ( डोळे पुसतात. शेजारणी आपापसांत हंसतात. ) म्हटलं, गरीबाची तर गरीबाची ! असो बिचारी ! पण गुणांनीं तरी धड असायची ? कशाला नांव काढतां ! अन् वर तुमच्यासारख्या चार शेजारणींच्या जवळ रडायचं, भेकायचं ! नाटकी तर अश्शी आहे. चल

जा इथून. बाळासाहेब जेवायला बसायची वेळ अन् बयेची यायची वेळ! अगदीं एक! एक घास घशाखालीं जाईल तर शपथ!

**रमा :** त्यांना एकदां तोंडानं म्हणूं द्या तुम्ही म्हणतां तें! माझ्यामुळं त्यांची पत्रावळ झाली आहे ना? त्यांनीं सांगावं मला तसं. तुम्ही नका सांगूं? त्यांनीं तसं म्हटलं तर—

**मथुरा :** हं ऽऽऽ! त्याच्याजवळ बोलायला हवं तुला? त्याचं नख तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं याच्यापुढं समजलं? रखमा, बाळासाहेबाला हात धुवायला यायचं आहे इकडे. ही ब्रह्महत्त्या दिसली कीं त्याचं डोकं फिरतं. हिला घालवून दे आधीं.

[ मिथुराबाई आंत जाते. ]

**रखमा :** वहिनीबाय, बाळासाहेब येत्याल ना! (रमा गप्प उभी.) वहिनीबाय, आईसाब लई कातावत्याल!

[ मथुराबाई पुनः बाहेर डोकावते. ]

**मथुरा :** नाहीं ना अजून गेली? बाळासाहेब, तूं बाबा आंतल्या न्हाणींत हात धू बरं! (दार लावते.)

**रमा :** (उतावीळपणें एकदम दारावर थाप मारून) ऐकलं का? जरा बाहेर या. मी असा काय अपराध केला आहे कीं मी प्रेमाच्या स्पर्शाला, आपल्या नजरेला सुद्धां पारखं व्हावं!

**रखमा :** (घाबरून) वहिनीबाय! उगीच मारहाण व्हईल ना?

**रमा :** (आवेगानें) मारहाण? रखमा, मारहाण करूं दे त्यांना मला. मला त्याचं कांहीं नाहीं. आम्ही दोघांनीं लग्न केलं. देवाब्राह्मणांना साक्षी ठेवून आयुष्यभर एकत्र संसार करूं म्हणून म्हटलं. त्यांना भेटल्याखेरीज मी कशी जाऊं? (पुनः दारावर थाप देत) ऐकलं का? गेले सहा महिने मी तुम्हांला भेटण्यासाठीं येत आहें ना? तुम्हांला माझी करुणा येत नाहीं का? आज सगळी लाजलज्जा सोडून मी तुम्हांला हांका मारतें आहें. येणार ना तुम्ही? बोलाल का माझ्याशीं एक शब्द? 'तूं माझी आहेस' म्हणून प्रेमाची पाखर तुम्ही माझ्यावर घातली होती ना? मी दृष्टीपुढें नसलें कीं तुम्ही अस्वस्थ होत होतां ना? आतां असं मी केलंय् तरी काय कीं माझ्याकडे पहाणं सुद्धां तुम्हांला विषासारखं वाटावं? येतां ना? आतां मला मुळींच धीर धरवत नाहीं.

**बाळासाहेब** : ( आंतूनच आवाज ऐकूं येतो ) आई, मला तिचा शब्द ऐकणं नको. ती पुनः येणार असेल तर मी हें घर सोडून जाईन. मी जातों ऑफिसांत.

[ दरवाजा बंदच असतो. ]

**रमा** : ( उतावीळपणें ) हें पहा. तुम्ही जाऊं नका. तुम्हीच माझ्यावर पाठ फिरविलीत तर माझं कसं होईल ? माझा वाली तरी कोण ? मी बाळंतपणासाठीं गेलें तेंव्हां 'प्रकृतीची काळजी घे बरं ' म्हणून गदगदलेल्या गळ्यानं तुम्हीच ना मला निरोप दिला ? लहानग्या विनूला घेऊन मी तुमच्यासाठीं धांवत आलें...अन् तुम्ही मला भेटत नाहीं, दिसत नाहीं ! आपल्या लहानग्या विनूला...( रडत रडत कपाळ दारावर टेकते. )

**रखमा** : ( डोळ्याला पदर लावून ) या पुरुषांची जातच अशी! बायका बाळंतपणाला गेल्या कीं यांची गिधाडनजर पडलीच दुसऱ्या बाईवर. मग ती बाई असू नाय तर बया असू !

[ रखमा जाते. मथुराबाई पुनः दार उघडून येतात. ]

**मथुरा** : चांगला चालला आहे तमाशा ! बायको आहेस का आहेस कोण ?

**रमा** : ( डोळे पुसून करारीपणानें ) हो. मी त्यांची बायको आहें. म्हणून तर इथें आलें.

**मथुरा** : ( वेडावून ) म्हणे, बायको आहें. अग तूं पुष्कळ म्हणशील. तो म्हणायला हवा ना ? उद्यां एखादी दारची वडारीण म्हणेल माझं घर आहे ! माझा नवरा आहे ! म्हणून का तिला घरांत घ्यायची आहे, जेवायला घालायचं आहे ?

**रमा** : ठीक आहे. मी इथेंच निजून राहीन. अन्नपाण्यावांचून वाळून वाळून मेलें तरी माझ्या घरीं मरण्यांत मला आनंद आहे.

[ उशाला लुगडें घेऊन तेथेंच निजते. ]

**मथुरा** : मरा मग खुशाल !

[ मथुराबाई रागारागानें आंत जाते अन् दार लावते. रखमा पदराखालीं दुधाची लोटी घेऊन येते, रमाबाई जवळ जाते. ]

**रखमा** : ( हळूच ) वहिनीबाय, दोन घोट दूध तरी प्या जरा.

[ रमा बसली राहते. ]

**रमा** : नको रखमा. आभाळ कोसळल्यावर ठिगळं देऊन काय होणार ! हक्काचं अन्नपाणी गेल्यावर दुसऱ्यांनीं दिलेलं किती दिवस मला जिवंत

ठेवील ? नको बरं. तुझ्या बाळाचं दूध आणून या फुटक्या नशिबाच्या वहि-नीला कशाला जगवतेस ?

**रखमा** : अव, 'फुटकं नशिब'–'फुटकं नशिब' कशाला म्हनूनशानी घ्येता ? बाळासाहेब कोना रांडामुंडाच्या नादीं लागलं, म्हून तुमी कशापायीं शिया दिऊन घ्येतां आपल्या आपल्याला ? अव, चट वळणावर येत्याल ! बाहेरच्या बायांचं प्रेम कसलं असतं त्ये त्यांना पन कळलच ना लवकर ! तुमी बी विनूबाळाला आना अन हिथं ठिवा. म्हनावं, संभाळा. तुमचं प्वार आहे.

**रमा** : कशाला या मारझोडींत त्या लहानग्या जिवाची चटणी करूं ? सासूबाईची मजल तर तें पोर यांचं नाहीं म्हणण्यापर्यंत गेली आहे ! (रडूं लागते.)

**रखमा** : अग कैदाशणी ! कोवळ्या पोरावर आळ ! हीं पापं तरी कुठं फेडशील ?

[एक शेजारीण भरलेलें ताट झांकून आणते आणि रमाबाईच्या पुढें ठेवते.]

**शेजारीण** : उठा वहिनी. उठा पाहूं. जेवा दोन घास. ( रमा नको म्हणते. ) तुमच्यासाठीं नाहीं. विनूसाठीं तर जेवाल ?

**रखमा** : जेवा कीं वहिनीबाय.

**रमा** : नको हो. जेवणावर इच्छाच नाहीं माझी !

**शेजारीण** : छेः ! असं कसं करून चालेल ?

**रमा** : नका हो मला आग्रह करूं. यांची भेट होईल तेव्हां जेवीन कीं मी.

**शेजारीण** : वहिनी, जो देव तुम्हांला आज सहा महिने प्रसन्न झाला नाहीं तो आतां होईल का ? आततायीपणानं आपण उपास कशाला काढायचे ? काय दशा ही तुमची !

**रमा** : आततायीपणा ? माझ्या घरांत हक्काचा घास खायचा मी आग्रह धरला तर त्याला आततायीपणा कसा म्हणतां येईल ?

**शेजारीण** : तुमचं म्हणणं खरं आहे. पण ज्या घरांतल्या माणसांत माणुसकी नाहीं, तिथें हा उपाय काय उपयोग ? आपलं हंसूं अन् जगाला तमाशा ! उठा. जेवा.

[ रमा स्वस्थ बसून राहते. रखमा जाते. मथुराबाई पुनः दार उघडून येते.]

**मथुरा** : तरी मी म्हणतें, ही एवढी लष्ठ कशी झाली ! आमच्या घरीं तमाशे करायला तुम्ही हिला जेवायला घालतां वाटतं ? बरं झालं. आतां इतके

लोक कैवार घ्यायला आहेत बाई तुझे! कशाला नवऱ्याचं घर हवं तुला? घरापेक्षां दारच मानवेल तुला चांगलं!

**शेजारीण :** मथुराबाई, घायाळ झालेल्या माणसाला लाथ मारणं कांहीं बरं नव्हे.

**मथुरा :** घायाळ झालेल्या माणसाला लाथ? कोण झालंय् घायाळ? ही का आम्ही? अहो, हिनं घरांत पाय ठेवला अन् आमच्या घरांत इस्टेटीच्या फिर्यादी सुरू झाल्या. ही घरांत आली अन् यांना विषम झाला. ही घरांत आली अन् दारची दहा शेराची म्हैस मेली. ही अवदसा घरांत आली अन् माझ्या अन् बाळासाहेबाच्यामध्यें भांडणं सुरू झालीं आणि तें हिचं पोर जन्माला आलं तशी जी महागाई झाली तिनं डोकं वर काढवेना!

**शेजारीण :** आतां याला ती तरी काय करील हो?

**मथुरा :** हें पहा, इतका तुम्हांला कळवळा आहे तर तुमच्या घरीं घेऊन जा. आमच्या घरीं ताट वाढून जेवायला घालायचं अन् आमचं चार चौघांत हंसं करण्याचं कांहीं कारण नाहीं. ऊठ ग. आधीं तूंच चालती हो. पुष्कळ वाट पाहिली. उठतेस का ढकलून देऊं?

**शेजारीण :** अहो, तिला जेवूं द्या कीं!

**मथुरा :** पुष्कळ जेवली. चल चालती हो! ( ताट भिरकावून देतात ) ऊठ!

[ रखमा आंतून बाहेर येते. बाहेर येऊन चकित होऊन उभी राहते. ]

**शेजारीण :** मथुराबाई!

**मथुरा :** जा ऊठ! त्या जेवायला घालतील नाहींतर गांव कांहीं ओस पडला नाहीं. काळतोंडे! दाखव तर तुझं तोंड इथें! गड्याकडून धक्के देऊन घालवून देईन.

[ मथुराबाई रमाला फरफरवीत नेऊं लागतात. रमा त्यांच्या हाताला हिसका देऊन उभी राहते. ]

**रमा :** ( त्वेषानें ) माणसाच्या जन्माला आलां पण तोंड माणसांचं नाहीं दिलं तुम्हांला देवानं! ऊठसूट 'काळतोंडी' म्हणतां? माझा काडीइतका अपराध नसतां मला आणि स्वतःच्या निरपराधी नातवाला घराबाहेर काढतां? हीं पापं तुम्हांला फेडावीं लागतील! यापुढं मला माहेर नाहीं न् सासर नाहीं. दुसरीकडे चार भांडीं उतरीन. एका वकिलाची बायको दुसरीकडे स्वयंपाक करून पोट जाळते आहे यामुळं माझं तोंड काळं नाहीं होणार, तुमचंच होईल!

[ जाते. पडदा पडतो. ]

# २

[ १ ]

केतकीच्या घराचा मागील व्हरांडा. रमाबाई पुष्पाची वेणी घालीत आहे. पुष्पा ५–६ वर्षांची मुलगी.

**पुष्पा** : मग माझ्या डोक्यांत फुलं घालशील ना ?

**रमा** : हो. घालीन बरं.

**पुष्पा** : अन् मला साडी नेसवशील ना ?

**रमा** : हो ! साडी नेसवीन. चोळी घालीन.

[ वेणी घालून होते. पुष्पाला आपल्या समोर धरून पहाते. ]

**रमा** : किती छान दिसते माझी भावली ! ( मुका घेऊन ) जा आतां खेळ बरं ! जिजा ! ए जिजा ! हिला घेऊन जा बरं.

**पुष्पा** : अं ऽ ऽ ऽ मी तुझ्याजवळ खेळणार.

[ जिजा येते. ]

**जिजा** : काय व ?

[ दुसऱ्या बाजूनें केतकीची सासू पूजेचें सामान घेऊन येते. ]

**रमा** : हिला ने जरा. जा. शहाणी आहे पुष्पा. मला काम आहे ना आतां ? काम झालं म्हंजे आपण खेळूं हं.

**पुष्पा** : अं ऽऽऽ

[ केतकीची सासू पुष्पासारखाच 'अंऽ ऽ ऽ' आवाज करते. रमा हंसत निघून जाते. ]

**जिजा** : आईपरीस रमाबाईचा लळा लागलाया पुष्पाताईला.

**सासू** : लागेल नाहीं तर काय होईल ? यांना का आया म्हणायचं ! मुलाला जल्म देणं दुसऱ्याच्या हातीं असतं, तर यांनीं मुलाच्या जन्मकळासुद्धां मोल-करणींना द्यायला लावल्या असत्या. एवढ्या दोनच पोरी. पण आमच्या सूनबाईना वाटतंय् का कधीं जवळ घ्यावं, हिडवावं ? सकाळीं उठल्या पोरी कीं पडल्या जिजाच्या नाहीं तर रमाबाईच्या गळयांत !

**जिजा** : अव, काय सांगूं ? रमाबाय नव्हत्या ना, तवां एकेक येळला मुलीला जेवाया बी मिळत न्हव्हतं.

**सासू** : काय कामं करतात कुणास ठाऊक ? तास अन् तास दारं लावून बसते.

**जिजा** : तरी आतां तुमी आल्यापून घरांत दिसत्यात तरी. न्हाई तर जवां बघावं तवा भाईर. जवां बघावं तवा भाईर. इकड जा. तकड जा. चार मैत-रणी गोळा कर. नाच. बागड. चाय करून पी. असलींच कामं ! सायबांची तरी वास्तपुस्त ? कशाला नांव काढताय् ? जवां तवा रमाबाय. रमाबायच्या जिवावर जनुं संसार चाललाया !

**सासू** : अग, त्यानं चक्क मला पत्रांत लिहिलं कीं, आई तूं इकडे ये, तुझ्या हातचं खावंसं वाटतंय् म्हणून. इतका मेला पैसा मिळवतोय्. गडी आहेत, नोकरमाणसं आहेत, पण माझ्या मुलांची कांहीं काळजी घेणारं कुणी नाहीं. बायकोच मुळीं ही अशी. मग दुसरी काय काळजी घेणार ? मी पहातें आहें आल्यापासून. माझं काळीज नुसतं तुटत असतं. अजून राणीसाहेब उठल्या नाहींत वाटतं ?

[ केतकी जिजाला हाक मारते. ]

**जिजा** : ( लगबगीनें ) काल नाटकाला गेल्या व्हत्या ना ? आतां उठत्याल. जात्यें जरा. पानी ठिवत्यें तोंड धुवाया. ( जाते.)

**सासू** : आणि माझा मुलगा उठून आंघोळ करून गेलासुद्धां. मुली उठून त्यांचंसुद्धां आटपलं. अजून बाईसाहेब लोळत पडल्या आहेत ! ( रमाबाईची आई आंत डोकावते. ) कोण आहे ?

**र. आई** : मी रमाची आई.

**सासू** : काय हो ?

**र. आई** : अहो, हा विनू रहात नाहीं घरीं.

**सासू** : रमा, ए रमाबाई.

[ रमाबाई बाहेर येते. ]

**रमा** : मला हांक मारली ?

**सासू** : तुझा मुलगा आला आहे ग.

**रमा** : अगबाई, आई, त्याला कशाला इथें आणलास ?

[ रमाबाई आईच्या हातून आपल्या मुलाला घेते. ]

**र. आई** : अग, मग मी तरी काय करूं ? दोन तास टाहो फोडला आहे त्यानं.

**रमा** : अन् आतां इथें रडला कीं बाईसाहेब रागावतील.

**सासू** : म्हंजे काय ? एवढंसं पोर. तें आईच्या मागं यायचंच केव्हां ना केव्हां.

**र. आई** : आतां तुम्हीच पहा.

**रमा** : आई, तें सगळं खरं. पण तूं याला घेऊन जा. एकदां जिवाचं नांव दगड ठेवून काम करायचं ठरवलं आहे ना मी ? मग कामाच्या वेळीं मला दयामाया धरून कसं चालेल ? उद्यां मुलगा इथें येतो म्हणून नोकरी गेली तर पुनः दुसऱ्या घरीं हिंडावं लागेल. जा घेऊन त्याला.

**र. आई** : अग जा जा काय ? तो राह्यला तर पाहिजे ! वर्षा दोन वर्षांचं पोर. त्याला आईजवळ जावंसं नाहीं का वाटायचं ? अन् तो रोज रोज तर कांहीं येत नाहीं ना ?

**रमा** : गरीब आईच्या पोरांनीं आईजवळ राहण्याचा हट्ट धरून चालायचं नाहीं आई ! कुत्र्यामांजरांचीं पोरं डोळे उघडायला लागलीं कीं केकाटत राहतात, पण स्वतंत्र होतात. ज्या माणसांना कुत्र्यामांजरांहून किंमत नाहीं त्यांच्या पोरांनीं रड रड रडायचं. आई उचलील म्हणून वाट पहायची नाहीं !

**सासू** : आणि श्रीमंताचं तरी काय हेंच. आमच्याकडेच पहा ना काय तऱ्हा आहे ! (जाते.)

[ आंतून केतकीचा आवाज : ' जिजा ! जिजा ! रमाबाई ! ' ]

**रमाबाई** : अगबाई. उठल्या वाटतं.

[ रमा मुलाला आईजवळ देते. मुलगा रडूं लागतो. ]

**र. आई** : आतां मी तरी याला संभाळत बसूं का सैंपाक करूं ? पांच सहा माणसांचा सैंपाक व्हायला तर हवा ना ?

**रमा** : ( निश्चयानें ) तूं जा तुझ्या कामावर. त्याला दूध पाज अन् खोलींत ठेव. बाहेरून कुलूप लाव. त्याच्या दुधासाठीं मला काम तर केलं पाहिजे ?

[ आंतून ' रमाबाई ! ' म्हणून हांक येते. रमाबाई जाते. रमाबाईची आई कपाळाला हात लावते अन् जाते. ]

## [ २ ]

केतकी बिछान्यावर लोळत आहे. आळस देऊन उठून बसते.

**केतकी** : जिजा, ए जिजा.

[ जिजा धांवत येते. ]

**जिजा** : जी ?

**केतकी** : तोंड धुवायला पाणी नाहीं आणलंस ?

**जिजा** : जी, हितच है ना ?

**केतकी** : है ना काय ! घाल हातावर. तें तस्त पुढें कर. जिजा, किती शिकवायचं ग रोज रोज ? हजार वेळां सांगितलं असेल, मी उठायच्या वेळेला पाणी, तस्त अन् चहा तयार ठेवीत जा म्हणून. अन् एवढा गळा काढून कोण रडत होतं ग ?

[ केतकी तोंड धुवूं लागते. ]

**जिजा** : रमाबाईंचा विनू—

[ केतकी तोंड धुतां धुतां थांबते. ]

**केतकी :** आला होता ना पुन्हां ? शंभर वेळां मी रमाबाईंना सांगितलं असेल कीं तें कार्ट इथें आणूं नका. पण त्या ऐकत म्हणून नाहींत! एवढा मोटा गळा काढला कीं माझी नेहमीं झोपमोड होते. (तोंड टॉवेलला पुसते.) भिकारडीं तीं भिकारडीं अन् एवढे मेले प्रेमाचे पान्हे !

**जिजा :** (स्वगत) खरंच. गरीब आईनं गरीब म्हणून मायासुद्धां करायची नाहीं. अन् श्रीमंत आयांचीं प्वारं कोकिळाच्या प्वारावानी दुसऱ्याच्या मायेंत वाढायचीं. या कलियुगांत गरिबाच्या अन् श्रीमंतांच्या प्वारांचं लई मरण आलंया !

**केतकी :** चहा नाहीं झाला ना अजून ? मुलाला घेऊन बसल्या असतील ! रमाबाई—

**जिजा :** नाहीं. मुलाला पाठवूनशानी दिलाया. पुष्पाताईसंगं बोलत्यात.

[ रमाबाई येतात. जिजा जाते. ]

**रमा :** काय ?

**केतकी :** अहो, काय म्हणून काय विचारतां ? चहा झाला नाहीं अजून ? हजार वेळां सांगितलं मला बेड्-टी लागतो म्हणून.

**रमा :** चहा मगाशींच ठेवला आहे आणून.

[ रमा चहा ओतूं लागते. इतक्यांत पुष्पा येते. ]

**पुष्पा :** चल ना खेळायला.

[ पुष्पा रमाबाईंचे ओचे धरून ओढते. ]

**केतकी :** आलांत ? पुष्पा ! काय हे कपडे ! बदल तरी.

**पुष्पा :** अंऽऽऽ ! रमाबाईंनीं बदलले कीं ग !

**केतकी :** या रमाबाईंना नाहीं अक्कल ! रमाबाई, हे कपडे सकाळीं घालायचे नाहींत. काय तरी बाई ! भिकार माणसं भोंवतीं जमवलीं कीं असंच लागायचं भिकार वळण !

[ रमाबाई मुकाट्यानें घरांत जातात. केतकीबाई पुष्पाला जवळ ओढतात. इतक्यांत केतकीच्या यजमानांचा आवाज ऐकूं येतो, 'केतकी ! केतकी !' जिजा गर्दीनें बाहेर येते. ]

**जिजा :** साहेब बोलावत्यात तुमास्नी.

**केतकी :** जा रमाबाईंना सांग. म्हणावं, बघा साहेबांना काय पाहिजे तें.

[ जिजा जाते. ]

**पुष्पा** : ए, जा. तुझा बाप बोलावतोय्.

**केतकी** : ( पुष्पाचा गालगुच्चा घेऊन ) कार्टे, काय एकेक बोलायला शिकतेस ? चल जा इथून.

[ केतकीची सासू एकदम पुढें येते. ]

**सासू** : अग, सारा दिवस नोकरमाणसांवर टाकलीं पोरं कीं असंच बोलणार तीं.

[ आंतून पुरुषी आवाज : ' नेहमीं रमाबाईंना कशाला पाठवते ! सगळीं काम काय रमाबाईंना सांगतां येण्यासारखीं असतात ? तूं आलीस तर काय होईल ? काय एवढी कामांत आहेस ? ' केतकी ताडकन् उठते. रागारागानें आंत जाऊं लागते.]

**केतकी** : यांना नेहमीं मी रिकामीच दिसतें. सासूबाई आल्यापासून तर माझं रिकामपण ज्याच्या त्याच्या डोळयावर येतं आहे. ( जाते. )

[ केतकीची सासू खोलींत सगळीकडे निरखून निरखून एकेक वस्तू पहाते. तिच्या पायाला कांही तरी लागतें म्हणून वाकून पहाते. केतकीच्या गळ्यांतील कंठा उचलून. ]

**सासू** : ही यांची व्यवस्था ! दागिने वाटेल तिथें. कपडे वाटेल तिथें. कुलूप आहे तर किल्ली नाहीं. किल्ली आहे तर कुलूप नाहीं. गडीमाणसं सगळीकडे हिंडायचीं. नवऱ्यांनीं हजारों रुपये मिळवले तरी काय पुरे पडणार यांना ? बघूं या तरी कितपत काळजी आहे.

[ केतकीची सासू कंठा निऱ्यांत लपवते, पुन: खिडकीबाहेर पहाते आणि आंत जाते. केतकी विषण्ण मनानें आंत येते. खिडकीबाहेर पहात रहते. पुन: आंत वळते. ]

**केतकी** : जाऊं द्या झालं. हें असंच चालायचं. काळजी अन् विचार करण्यांत अर्थ नाहीं.

[ आरशाजवळ जाते. आपल्या रूपाकडे बघत राहते. ' ही नार रूप सुंदरी ' हें गाणें गुणगुणत राहते. आरशांत गाल थापटून, दंड पिरगळून मागें पुढें वळून निरनिराळ्या बाजूंनीं आपलें रूप पहाते.]

**केतकी** : जिजा ! जिजा ! ( आंतूनच ' जी ! ' म्हणत जिजा बाहेर येते. ) जिजा, मी आतांशीं थोडी लठ्ठ दिसतें का ग ? ( जिजा गोंधळते. केतकी आरशांतून तोंड काढून जिजाकडे पहाते. ) कां ग ?

**जिजा** : ( हंसू दाबीत ) तस नवं बाईसाब. मी लठ्ठ कुनास्नी म्हणावं याचा इचार करीत व्हत्यें. आतां मी अश्शी कानडी मुलखांत व्हत्यें ना ? तर

एकेक बाई ही असल्या दंडाची. अव काय सांगू ? दहा दिवसांतलं पोर एक जन कुशींत घेऊनशानी निजली, तर पोर गुदमरूनशानी मेलं !

**केतकी** : इश्श ! इतकी का लठ्ठ आहें मी ! बरं तें पुस्तक दे पाहूं. अन् रमाबाईना म्हणावं लिंबाचा रस आणा आणि गवला काचरी, हळद, बदाम, वाटून आणा.

**जिजा** : ( समजुतींत घोटाळते ) जी ! ( जाते. )

**केतकी** : ( आरशासमोर पुस्तकांत पाहून ) केसांच्या बुंध्याशीं बोटाच्या टोकांनीं हळू हळू चोळावें. रक्ताभिसरणानें केसांची वाढ होऊं लागते. ( बोटांच्या टोकांनीं हळू हळू केसांचे बुंधे चोळीत पुढें वाचते.) एक दोन मिनिटें चोळण्यानें पुरेसा व्यायाम होतो. ( घड्याळांत बघते. थोडा वेळ चोळून केंस बांधते. इतक्यांत रमाबाई येतात.) झालं वाटून ?

**रमा** : झालं. अन् हा लिंबाचा रस. यांत साखर घालूं ?

**केतकी** : छेः छेः ! तो तसाच प्यायचा. खरं म्हणजे चहाच्या सुद्धां आधीं प्यायला पाहिजे.

**रमा** : पित्त झालंय वाटतं ?

**केतकी** : नाहीं हो. यानं लठ्ठपणा कमी होतो अन् थोडं गोरं होतं माणूस.

**रमा** : तुम्ही कुठं लठ्ठ आहांत ? इतकं हवंच माणूस.

**केतकी** : ( आशेनें ) खरंच मी लठ्ठ वाटत नाहीं का हो ?

**रमा** : छेः !

**केतकी** : बरं. आतां मी सांगतें तसं करा. हें वाटण मी तोंडाला लावणार आहें.

**रमा** : मग आंघोळीचं पाणी काढूं ?

**केतकी** : इश्श ! इतक्यांत ? अहो, हें वाटण दोन तास तोंडावर ठेवायचं.

**रमा** : ( हंसू दाबून ) अन् कुणी आलं तर ?

**केतकी** : अगबाई, आधीं तें दार लावा; नाहींतर सासूबाई येतील ! आतां रोज हें मी करणार आहें. दोन तास मी घरांत नाहींच समजा.

**रमा** : आणि सासूबाईंना—

**केतकी** : त्यांना गुंतवून ठेवा. बोलत रहा त्यांच्याबरोबर.

**रमा** : ( हंसून ) बरं. ( जाऊं लागते )

**केतकी** : थांबा. आज पहिलाच दिवस आहे. तुमची जरा मदत लागेल. ( उठते आणि लिंबाचा रस पिते. ) अरे अरे अरे अरे ! किती बाई आंबट हो ! ( तोंड वाईट करून शहारे देते आणि वाटून आणलेल्या वाटणाचा वास घेते. ) वाः याचा वास मोटा छान येतो हं !

**रमा** : त्यांत गवला, काचरी, चंदन–सगळं वासाचं आहे ना ?

[ केतकी आपल्या तोंडावर आरशांत बघून लेप देते. रमाबाई बघत राहतात. चेहऱ्यावर लेप दिल्यावर नाक, तोंड, डोळे खुले असलेलें एक कापड हातांत घेते. ]

**केतकी** : हं हें बांधा पाहूं तोंडावर ! ( रमाबाईंना मोठ्यानें हंसूं येतें. ) हंसूं नका. अहो, सुंदर व्हायचं म्हणजे या सगळ्या कळा काढाव्या लागतात.

[ रमाबाई कापड बांधतात. सुनंदा येते. ]

**सुनंदा** : हॅलो !

[ केतकीकडे बसून हंसून हंसून तिची मुरकुंडी वळते. ]

**केतकी** : अग हंसतेस काय ? तुझ्या पुस्तकांतले उपचार सुरू केले. तुला लावायचं आहे का ? रमाबाई, लावा हिच्या पण.

[ रमाबाई लेपाला हात घालतात. ]

**सुनंदा** : ( अजून हंसतेच आहे. ) नको ! नको बाई मला ! अग दिवसाढवळ्या असं हिंडलं तर लोक दगड मारतील.

**केतकी** : पण बाहेर जायचंच नाहीं. दोन तास दार लावून घरांत बसायचं. बरं, रमाबाई, जा तुम्ही. आज सुनंदा इथेंच जेवील. आज काय करणार आहां तुम्ही ?

[ सासू हळूच दारांत उभी रहाते. केतकीची पाठच तिला दिसत असते. ]

**रमा** : काय करूं ?

**केतकी** : शिरा करा. ही आहे गोडखाऊ. अन् शिराच केला म्हणजे साहेबांना पण आवडेल.

**रमा** : पण साहेब शिरा पानांत पडूं देत नाहींत.

**केतकी** : हो का ? मग काय बरं कराल ? बटाट्याच्या पुऱ्या करा. त्या साहेबांना फार आवडतील.

**रमा** : बटाटा तर साहेबांना मुळींच आवडत नाहीं.

**केतकी** : हो का ?

[ केतकीची सासू एकदम पुढें येते. ]

**सासू** : 'हो का ?' काय ग ? ( केतकी एकदम पाठ फिरवते. ) तुझ्या नवऱ्याला काय आवडतं हें तुला माहीत नाहीं ? मैत्रिणीला काय आवडतं हें तुला अगदीं तोंडपाठ! बायका आहांत का आहांत कोण ? तुमच्या नवऱ्यांच्या चवी स्वयंपाकिणींना माहीत ! ( एकदम सुनंदेजवळ जाऊन ) काय हो, तुम्हांला तरी हें बरं वाटतं का ? ( केतकीच्या चेहऱ्याकडे लक्ष जातें. ) हा मेल्यानों ! हें काय ? कांहीं ळळीत करीत होता कीं नाटक ? हा मुखवटा कसला ? काय ग रमा ?

[ रमाबाई मुकाट्यानें आंत जातात. केतकी रागारागानें तोंडावरचें फडकें सोडते. सुनंदा हंसत असते. केतकी तोंडावरचा लेप निपटते. ]

**सासू** : हा मेल्यानों ! अग, हें काय ?

**केतकी** : ( रागानें ) कांहीं नाहीं. काल डास चावला होता म्हणून लावलं.

**सासू** : डास ? डास चावला ? म्हणजे डास तरी केवढा होता ? आणि त्याच्यासाठीं एवढे लेप ? नवलच बाई एकेक !

[ केतकी रागारागानें आंत जाते. ]

**सासू** : सुनंदाबाई, हें कांहीं बरं नाहीं. सगळा वेळ हें असं ! संसार तरी कसे व्हायचे अशानं ?

**सुनंदा** : अहो आजी, बायका सुंदर असल्या कीं, नवऱ्यांचं इतर गोष्टींकडे लक्ष नसतं !

**सासू** : अहो ! सुंदर बायको झाली म्हणून काय झालं ? पोळी अन् भाजी म्हणून तिला खातां तर येत नाहीं ना ? आणि सुंदर आई पाहून मुलांचं पोट भरत नाहीं ना ? अहो, हिचा नवरा लहान होता, तेव्हां आमचा वेळ सगळा यांत जायचा ! हें खायला करून घाल. तें घाल. अन् आतां सगळा वेळ असलीं थेरं करायचीं आणि तिकडे घराची खाणावळ करायची ! कुणीही यावं. कुणीही सैपाक करावा. कुणीही जेवायला वाढावं ! सोन्यासारखा नवरा. पोरं. कुणी पहातं आहे का ? किती जेवलीं, काय काय जेवलीं ? कोण पहाणारं आहे हो !

[ केतकी रागानें येते. ]

**केतकी** : म्हणजे काय ? मी कांहीं मेलें नाहीं.

**सासू** : तें खरंच आहे. पण गेल्या पंधरा दिवसांत मी कांहीं तुला त्याच्या पानाशीं बसून विचारपूस करतांना पाहिलं नाहीं.

**केतकी :** तुम्ही आहांत ना ? मग मी कशी बसूं ? तेंही आवडायचं नाहीं तुम्हांला.

**सासू :** खरंच. आणि मी नव्हतें तेव्हां तूंच चवकशी करीत होतीस ना ?

**केतकी :** आणि मीच चवकशी करायला कशाला हवी ? आतां का लहान आहेत ते ? आम्ही नाहीं का एकेकट्या जेवत ? कोण असतं आम्हांला विचारायला ? त्यांतून रमाबाई आहेतच कीं. त्यांना सांगून ठेवलंय् सगळं.

**सासू :** काय ग ? काय सांगितलं आहेस त्यांना तूं ? तें दिसलंच ना आतां ? नवऱ्याला काय आवडतं हेंसुद्धां माहीत नाहीं. आणि म्हणे, रमाबाईना सांगितलंय् ! नवऱ्याचा कपडालत्ता, खाणंपिणं याकडे जातीनं लक्ष दिलं म्हणजे नवरा निम्मा मुठींत राहतो.

**सुनंदा :** आणि निम्मा निसटतो तो ? अहो, नवरा हा निसटणारा प्राणी आहे ! त्याला किती संभाळा !

**सासू :** होय ? मग ठीक आहे. खा ठेचा नि भोगा फळ !

**सुनंदा :** हो. आमच्या आम्ही ठेचा खाऊं नि भोगूं. जें उठतं तें आम्हांला उपदेश करतं. श्रीमंत घ्या, नाहीं तर गरीब घ्या. बाइचं मेलं एकच आयुष्य. नवऱ्याची ताबेदारी. आम्ही नवीन पिढीच्या बायका आहोंत. आमचे हक्क आम्हांला चांगले कळतात.

**सासू :** असे हक्क दाखवून संसार केले म्हणजे तमाशेच व्हायचे लोकांना !
[ जिजा येते. ]

**जिजा :** आज धुण्याभांड्यांची मोलकरीण आली नाहीं जी.

**केतकी :** जा त्या रमाबाईना सांग.

**जिजा :** त्या म्हणतात तुमास्नी सांग अन् तुमी म्हणताय् त्यास्नी सांग.

**केतकी :** या रमाबाईना तर एक दिवस निभावून नेतां येत नाहीं !
[ केतकी जाते. ]

**सासू :** आतां ती बाई आणखी तरी काय निभावणार ? सगळ्या घराची ठेवरेव, देखरेख तीच करते. आमच्या सूनबाई म्हणजे दिवसभर चहा, पाणी, चटक मटक लुगडीं, औषधं, अन् चार नगरभवान्या गोळा करून कलप कलप करत राहतात.

**सुनंदा** : (चिडून) आम्हांला म्हणतां होय नगरभवान्या ! केतकी, ही मी जातें.

**सासू** : अहो, जातां काय ? मी तुम्हांला नाहीं म्हणत.

**सुनंदा** : सगळं कळतंयू मला. एक वाक्य धड बोलतां येत नाहीं. तुमचे जोडे खायला मी तुमची सून नाहीं.

[ रागारागानें सासूकडे पहात निघून जाते. ]

**सासू** : जा ! खुश्शाल जा ! आतां या रमाला हाताशीं धरूनच सूनबाईंना वठणीवर आणलं पाहिजे.

[ केतकी येते. ]

**केतकी** : हें काय ? सुनंदा गेली वाटतं ? मला वाटलंच. (थांबून) जिजा, ए जिजा ! ('जी !' म्हणत जिजा येते.) हें बघ, जानकीबाईंकडे जा आणि म्हणावं, एकादी बाई बघून द्या आम्हांला !

**सासू** : आतां आणखी बाई हवी ?

**केतकी** : (त्रासून) होय. हवी आहे मला.

**सासू** : अग, पण, आतां स्वयंपाकाला बाई आहे, वाढपी आहे. धुण्या-भांड्याला मोलकरीण, गडी आहेत. वर कामाला बाई आहे. दोन मुलींना संभाळायला दोन पोरं आहेत. डायव्हर आहे...

**केतकी** : हो. तरीसुद्धां मला बाई हवी. चार चार, सहा सहा दिवस मी सोडलेलीं लुगडीं जागच्या जागीं पडतात. जिजाला उचलायला वेळ होत नाहीं.

**सासू** : मग ? आपल्या लुगड्याच्या घड्या आपण कराव्या.

**केतकी** : नाहीं करणार. मला तरी वेळ हवा ना !

**सासू** : अग, करीत तरी काय असतेस एवढं ?

**केतकी** : काय वाटेल तें करीत असेन. हा माझा संसार आहे. अन् तो माझ्या पद्धतीनंच मी करीन.

**सासू** : मी कुठं बाई नाहीं म्हणतें ! तुझाच संसार आहे. म्हणून तर तुमचं लग्न झाल्यापासून सहा वर्षांत फिरकलें नाहीं इकडे. मी सगळं ओळखून आहें. ठेव बाई. दहा माणसं ठेव बरं आणखी ! लुगड्याच्या घड्या घालायला एक, लुगडं नेसवायला एक, संडासांत हातावर पाणी घालायलासुद्धां ठेव एक हो. पण नवऱ्याला सुख दे. मुलगा पोटचा म्हणून माझा जीव तुटतो !

[ 'रमा ! रमा !' बाहेर हांक ऐकूं येते. केतकीबाई जातात. ]

**सासू :** अशा सुनांना वठणीवर आणायला जालीम हत्यार हवं. आतां स्वयंपाकीण मिळून घरांत टिकूं देणार नाहीं मी. म्हंजे सरळ वठणीवर येईल. नाहीं तर असं केलं तर ? ( विचार करीत ) रमा बिचारी चांगली आहे. अशी सून माझी असती तर ! रोज मीठमोहऱ्या ओवाळल्या असत्या ! ( निश्चयानें ) बाकी आतां या रमाबाईला हाताशीं धरून सूनबाईचे दांत पाडले पाहिजेत.

[ केतकीबाई व जानकीबाई बोलत येतात. ]

**जानकी :** रमाला एखाद्या संस्थेंत ठेवावी म्हणतें. तुमच्या इथें मुलाची सोय होत नाहीं. फार परवड होते बिचारीची ! शिकली कीं सुटली.

**केतकी :** ( गयावया होऊन ) जानकीबाई, नका शिकण्याचं वेड रमाबाईच्या डोक्यांत भरवूं. आतां या वयाला त्या शिकून काय करणार ?

**जानकी :** म्हणजे काय ? तुमच्या घरीं बाई नाहीं म्हणून तिचं बिचारीचं नुकसान करूं ? व्यक्तीकडे रहाण्यापेक्षां अशा बायकांनीं संस्थेंत राह्यलेलं बरं.

**सासू :** जा हो घेऊन तिला. शिकली तर बिचारीचा वनवास तरी कमी होईल.

**केतकी :** (रागानें) वाः घेऊन जा म्हणे ! त्या गेल्या तर इथं स्वयंपाक कोण करील ? तुम्ही ? ( खोटकर प्रेमळपणें ) खरंच. तुम्ही रहा इथें म्हणजे तुमच्या मुलाला पण चांगलं खायला मिळेल.

**सासू :** खरंच आहे. सासूची आठवण अन् प्रेम स्वयंपाकाची बाई नसेल तेव्हां ! तुम्ही ९–९ वाजेपर्यंत घोरत पडायच्या. संध्याकाळीं फिरायला नाहीं तर पत्ते कुटायला जायच्या. सासूबाई पुराणाला गेल्या तरी तुमच्या डोळयावर यायचं तें. सासूनं घर राखावं. सैंपाकही करावा. अन् तुम्ही ? मजा मारावी !

**केतकी :** कसंही बोललं तरी तुम्हांला वाकडं लागतं.

**सासू :** (रागानें) कसंही म्हणजे ? तुझी स्वयंपाकीण म्हणून मला रहा म्हणतेस होय ? अत्तांच्या अत्तां रघूला सांगतें, मला पाणी प्यायला राह्यचं नाहीं या घरांत. ज्या घरांत आपला मान नाहीं, तिथें तुकडे मोडायला मी कांहीं भिकारीण नाहीं ! ( जाते. )

**जानकी :** हें बरं नाहीं बोललां तुम्ही.

**केतकी :** मला बाई आतां उपदेश नका करूं. ( थांबून ) अन् हें पहा

जानकीबाई, रमाबाईंच्या मुलाचाच प्रश्न आहे ना ? मी घेतें त्याला ठेवून. मग तर झालं.

**जानकी** : तसं ' झालं ' असं नाहीं म्हणतां येत. पण सध्यां तरी काळजी मिटली. पण पुढें मागें मी तिला शिकायचाच आग्रह करणार आहें. जातें मग आज मी. ( जाते. )

**केतकी** : काय मेला संसार ! किडे पडतात डोक्यांत किडे ! ( ' रमा ! रमा !'–बाहेरून आवाज येतो. ) कोण आहे ?

[ मथुराबाई दागदागिन्यांनीं नटलेली येते. आंत डोकावते. ]

**मथुरा** : कुणी आहे का घरांत ?

**केतकी** : कोण आहे ?

**मथुरा** : मी आहें. ( आंत येते. )

**केतकी** : काय काम आहे ?

**मथुरा** : तुमच्याकडे कुणी रमाबाई म्हणून स्वयंपाकाला आहे ना ?

**केतकी** : हो, काय काम आहे ?

**मथुरा** : तिला जरा बोलवा.

**केतकी** : काय काम आहे तें सांगा. त्या कामांत आहेत.

**मथुरा** : ( कडवटपणानें ) अहो, मी तिची सासू आहें.

**केतकी** : हो का ? रमाबाई, अहो रमाबाई.

[ रमाबाई येतात. ]

**मथुरा** : या. आलांत ? आतां तुमचे हे चाळे बंद करा. आमच्या गांवांत राहून स्वयंपाकाचं काम करून नवऱ्याला कमीपणा आणायला शरम नाहीं वाटत ? ( नरमाईनें ) आतां तुम्हीच सांगा, तुमचे यजमान आणि हिचे यजमान एकाच क्लबांत जातात. नाहीं म्हटलं तरी ही इथं स्वयंपाक करीत बसली म्हणजे चार चौघांत होणारच ना, कीं अमक्या तमक्याची बायको यांच्या घरीं स्वयंपाक करते म्हणून ? म्हणजे काय राहिली आमच्या मुलाची शोभा ?

**रमा** : ( चिडून ) पण ही शोभा करण्यापूर्वीच विचार करायला हवा होतात ! नाहीं तर अजून द्या मला दहा वीस हजार रुपये तोडून. म्हणजे मोटारींतून हिंडून तुमच्या मुलाची शोभा वाढवीन.

**केतकी** : अग बाई ! तुमचे यजमान अन् आमचे हे एका क्लबांत जातात ? हें नव्हतं मला माहीत.

**मथुरा** : मग, आतां तुम्हीच सांगा, आपल्या नवऱ्याला असा कमीपणा आणणं हिला शोभतं कां ?

**रमा** : ( चिडून ) नवरा ? कुणाचा ? त्यांनीं मला बायको म्हणून संभाळलं नाहीं ना ? मग मी माझं अन् त्यांच्या पोराचं पोट कसं जाळणार ?

**मथुरा** : त्यांचं पोर ? कुणाला माहीत त्यांचंच आहे का !

**रमा** : ( आवेशानें ) तोंड संभाळून बोला ! त्यांचं नाहीं तर कुणाचं ? तोंडावळा पहा. आंधळंसुद्धां सांगेल. तुमची म्हणजे कसायाची जात आहे ! मला घराबाहेर काढलीत तर काढलीत अन् कारण नाहीं कांहीं सांगण्यासारखं म्हणून भलभलते आरोप घेतां माझ्यावर ? हीं पापं तरी कुठं फेडाल ?

**मथुरा** : तुझीं पापं भरलीं म्हणून रस्त्यावर जायची वेळ आली तुला. आमच्या पापाचं कशाला बोलतेस ?

**रमा** : बाईसाहेब, कशाला तुम्ही मला बाहेर बोलावलंत ? या बाईना मला भेटायचं नाहीं. यांचं कुणाचंही तोंड पहाण्याची माझी इच्छा नाहीं. यांनासुद्धां अर्धा डझन मुली आहेत. त्यांचंसुद्धां अजून व्हायचं आहे सगळं. मुलींच्या आईला तरी अंतःकरण असायला पाहिजे ! पण नवऱ्याचं मन बिथरलं म्हणजे सासवांचीं काळजं उरफाटीं होतात.

**केतकी** : अहो, सासवांचीं काळजं उरफाटीं झालीं म्हणजेसुद्धां कित्येकदां नवऱ्यांचीं मनं फिरतात.

**सासू** : आतां तुम्ही तिचीच कड घेऊन बोलणार. तुमचं स्वयंपाकाचं तटेल ना !

**केतकी** : हें पहा, माझ्या घरांत येऊन तमाशा केलात एवढा पुरे झाला ! जा पाहूं आधीं बाहेर. माझ्या घरांत येऊन मलाही बोलाल कीं काय ?

**मथुरा** : ( जातां जातां ) अहो, तुम्ही उपऱ्या बायका. तुम्ही ज्या एवढ्या कड घेऊन बोलतां त्या काय जन्माचा पत्कर घेणार आहां कीं काय ?

**केतकी** : घेईन घेईन. रमाबाई, तुम्ही अगदीं काळजी करूं नका. तुमच्या मुलाला पण संभाळीन, अन तुम्हांला पण संभाळीन ! अहो, काम करणारें माणूस कुणाला जड होत नाहीं.

**मथुरा** : बघेन किती दिवस तुमचा प्रेमाचा पुळका राहतोय् तो.

**केतकी** : तुमच्यापेक्षां अधिक राहीलच राहील. तुम्हांला काळीज तरी आहे का ?

**मथुरा** : बघेन, वेळ आली कीं सगळयांचीं काळजं उरफाटीं होतात.

[ मथुराबाई जातात. ]

**केतकी** : ( स्वगत ) आतां या बाईला चिकटून घ्यायची हीच वेळ आहे. ( उघड ) रमाबाई, तुमच्या मुलाला आजच आणा पाहूं इथं. त्याच्याकरतांच संस्था नि घरं धुंडायचीं ना ? येऊं द्या इथें मुलाला. कामांत व्यत्यय येऊं देऊं नका, म्हणजे झालं.

**रमा** : ( हात जोडून ) एवढं केलंत तर आणखी काय हवं ? या वयाला मला सुद्धां शिक्षण होईलसं वाटत नाहीं.

**केतकी** : ( कपाट धुंडून ) हीं घ्या दोन लुगडीं. मी देईन देईन म्हणतच होतें कितीक दिवस. बरं, आतां जरा मी बाहेर जातें. खरंच, आधीं सासूबाईच्या पाया पडून त्यांना आणलं पाहिजे. नाहीं तर हे आकांडतांडव करतील. ( जाऊं लागते.) आणि हें पहा, या कपाटाला कुलूप लावून किल्ल्या ठेवा तुमच्याजवळ.

**रमा** : ( घाबरून ) नको, नको. ही जबाबदारी नको माझ्यावर. ( केतकी आधींच गेलेली असते. रमाबाई कपडे, दागिने न पाहतांच दार लावते. ) बाई ! बाई ! ही असली जोखीम म्हणजे जिवावर यायची एखादां.

[ पडदा पडतो. ]

# ३

[ १ ]

केतकीच्या घरांतील केतकीची साधारण सजवलेली अशी खोली. जिजा केतकीच्या अंगाला मालिश करीत असते. मालिश करतां करतां गप्पा मारीत आहे. एकीकडे घामानें डबडबली आहे.

**केतकी** : अग. यांचं नेहमीचंच असं आहे, अन् आतां तर काय ? सासूबाई आहेत हरघडीं कानाला लागायला.

**जिजा** : त्ये कांहीं विचारू नका. सासवांची जात असलीच असती. अव, आतां काय सांगूं ! त्या रमाबाईच्या अन् सासूबाईच्या हरघडीं कानगोष्टी चाललेल्या असतात.

**केतकी** : काय ग बोलत असतात एवढं जिजा ?

**जिजा** : ( मालिश थांबवून ) आतां मला तरी काय ठाव ? मी गेल्यें कीं गप्प बसत्यात.

**केतकी :** होय ना ? या रमाबाईला कुणी दाराशीं तरी उभी केली असती का पोराला संभाळून ? हं. थांबवूं नको. चोळ.

**जिजा :** ( चोळूं लागते. ) अव कसलं आलंय्. कुनी आपल्या करंगळीवर थुंक म्हटलं तर थुंकायला तयार नसतं, तर असं कोन कुनाला संभाळतंय् ?

**केतकी :** संभाळीत तर नाहीं कुणी. पण एखाद्यानं संभाळलं तर नाकांत काड्या घालायला हजार जण असतात.

**जिजा :** तर काय ! परवा जानकीबाई भेटूनशानी गेल्या ना रमाबाईला ?

**केतकी :** हो ना ! आतां काय थेरडी पुन्हां बिथरवते आहे कीं काय त्यांना ?

**जिजा :** कुनाला माहित ! पन वाढुळ बोलत बसल्या व्हत्या.

**केतकी :** त्या म्हातारीला पण कांहीं लाज आहे का ? हजार वेळां तोडून बोललं तरी पुनः आहेच हजर !

**जिजा :** कांहीं 'पोटगी' 'पोटगी' 'वकील' असलं कांहीं बोलत व्हत्या दोगी. ( चोळण्याचें थांबते.)

**केतकी :** अस्सं, अस्सं ! पण माझ्याजवळ मात्र बोलत नाहींत हं कांहीं. हं. चोळ.

**जिजा :** पन परवा साहेबास्नी बी काइ काइ विचारत व्हत्या वाटत ?

**केतकी :** कोण, रमाबाई ? साहेबांना विचारीत होत्या ?

**जिजा :** त्या अन् सासूबाई पन मधून मधून कांहीं बाहीं बोलत होत्या.

**केतकी :** हो ? मला नाहीं हं कांहीं कळलं.

**जिजा :** ( जरा हंसून दटावल्यासारखं. ) तुम्ही असतां कधीं घरामंधी !

[ जिचा चोळणें थांबवते. ]

**केतकी :** अग वेळ हवा ना ? आणि हें बघ. आपण चार लोकांत गेलं, बसलं, तर ना चार लोक आपल्याकडे येतील ? अन् दुसरं असं, बाई म्हणजे घराचं वैभव. तुमची संपत्ती, वैभव दिसायचं तें बायकोवरूनच दिसायचं असतं. तसं म्हटलं तर मी इकडे जातें म्हणजे काय ? ह्यांचं वैभव मिरविण्यासाठीं. हं, चोळ. थांबूं नको.

**जिजा :** ते बि खरंच हाय.

[ आंत 'रमाबाई,रमाबाई' म्हणून केतकीच्या यजमानांची हांक ऐकूं येते.]

**जिजा :** साहेब रमाबाईस्नी बोलावत्यात जनु.

**केतकी** : हो. आजकाल मला अगदीं हांक मारीत नाहींत.

**जिजा** : हां. खरं म्हनतायसा. मी पन ह्येच म्हनत व्हत्ये.

**केतकी** : अग, त्याचं असं झालं...मीच त्यांना म्हटलं एकदां कीं, रमाबाईना सगळं माहीत असतं घरांतलं, त्यांनाच विचारीत जा म्हणून. त्या दिवशीं ते खूप रागावले. त्यांनीं मला सांगितलं, रमाबाईंच्यावर सगळं टाकतेस अन् ही साड्यांचीं अन पोलक्यांदागिन्यांचीं प्रदर्शनं करीत हिंडतेस ! हिंडायचं नाहीं असं. पण मी तरी काय म्हणून ऐकेन ? मी साफ ऐकायची नाहीं. मला तरी दिवस निघायला हवेत ना ?

**जिजा** : हां. त्ये बी खरंच

**केतकी** : माझा आपला हा स्वभाव आहे. लहानपणापासून आनंदी नी हौशी. मला नाहीं आवडत कुणी उगीचच झिणत बसलेलं. अन् यांचं अगदीं माझ्या उलट आहे. मला नाहीं बाई आवडत.

**जिजा** : असंच आहे.

[ केतकीच्या सासूबाई येतात ]

**सासू** : अगोबाई ! हें काय ?

**केतकी** : ( एकदम उठून ) कांहीं नाहीं. जरा हात दुखत होता.

**सासू** : कशानं ग ?

**केतकी** : वातानं असेल. बरं जिजा, लवकर ये. मी जातें पुढं. अंग धुवून जायचं आहे मला. कपडे ठेवलेस ना ?

[ जिजा मान हलवते. केतकी जाते. ]

**सासू** : किती दिवस दुखतो आहे ?

**जिजा** : ( हंसून ) अहो, जन्मभर दुखतोय अन् जन्मभर दुखनार !

**सासू** : म्हंजे ?

**जिजा** : अव काय सांगूं तुमास्नी ! कुठल्या दाक्तरांनीं सांगितलं हाय त्यास्नी चोळून घ्या म्हून.

**सासू** : अग पण कां ?

**जिजा** : अव लठ्ठपन जाऊन शेलाट्या व्हायाला होवं ना ? म्हून.

**सासू** : अन् तूं काय डोंबल्यावर पाणी ओतलंस का काय तुझ्या ?

**जिजा** : तुमच्या सुनेला रगडूनशानी घाम आलाया यवढा !

**सासू :** ह्या मेल्यांनो !

**जिजा :** अव, ह्ये काय रगाडनं ? माझं हात दुखूनशानी येत्यात तरी 'पुर' बी म्हनत न्हाईत. अन् ह्यो मेला दाक्तर तरी कोन मालिश कराया सांगनारा ?

**सासू :** अग डाक्टरांना काय ? पैसा मिळवायचा. श्रीमंतांना श्रीमंती उपचार, गरिबांना गरिबी उपचार.

**जिजा :** हां. ह्ये मात्र खरं बोलला. हीच मी ग्येले असते दाक्तराकड अन् म्हटलं असतं कीं, बाबा माझीं हाडं निघालीं हैत, तर म्हनला असता, नांगराला जुपूनशानी हिंडवाया सांग दादल्याला !

**सासू :** ( हंसून ) जिजा, तुला तरी शालजोडींतले जोडे छान मारतां येतात हं.

**जिजा :** ( चिडून ) मग काय तर ? अव जरा मानसानं बी विचार कराया होवा. सारा दिवस काय ह्ये ! आमच्या मंदी तर नवरा असल चाळ कदींबी चालू द्येनार न्हाई ! अव काय सांगूं ? डोंबलाला त्येल लावून रोज इच्चरल तरी बी नांव ठेवत्याती अन् इकडे दिवसांतून दहादा येण्या, दहादा साड्या, ती गालाची अन ओठांची रंगरोटी !

**सासू :** म्हंजे ?

**जिजा :** तुमी अजून काई पाहिलं न्हाई जनुं. ( हळूच ) तुमास्नी जरा भित्याती अजून. भाईर निघाल्या कीं नखरा करून या दारानी जात्यात निघून तुमचा डोळा चुकवूनशानी. आज कितीक दिवस पाह्यलय् मी.

**सासू :** हो का ? पण ही रंगरोटीची काय भानगड आहे ?

[ हातांतील जपमाळ ओढूं लागते. जीजा हंसून केतकीच्या आरशाच्या टेबलाजवळ जाते व एकेक वस्तु दाखवते. ]

**जिजा :** आतां काय सांगूं ? दाखवूं का तुमास्नी ? ही पहा पावडर. ही अशी लावायची. यावर ही लाल भुकणी लावायची. म्हंजे गुलाबी गाल दिसत्यात. अन् ही कांडी हैना ? ती ओटांवरून फिरवायची कीं लाल चुटुक ओठ दिसत्याती. अन् ह्यो चिमटा नाकाला लावायचा. अस्सा, कीं नाक चवळीच्या शेंगेवानी व्हतंय्. अन् या कांड्यांना केस गुंडाळूनशानी रात्री ठिवायचं. म्हंजे कुरुळ केस व्हत्याती.

**सासू :** तरी इतके दिवस मी म्हणें, हें काय आहे ? अस्सं ! पण एवढं कशाला हो मी म्हणतें ?

**जिजा :** आतां काय सांगूं आईसाहेब! अव, चार लोकांची नजर खिळती ना?

**सासू :** जळळं मेलं! करायची काय ती चार लोकांची नजर? आमच्या कोंकणांत कुणी असं केलं तर तिच्या शेजारीं चांगल्याच्या बायका फिरकायच्यासुद्धां नाहींत.

**जिजा :** ह्ये शहर हाए. तुमच्या सूनबाईच्या मैतरणी बी ह्ये लावत्याती. येत्याल समद्या तवा बगा उगीच आपलं.

**सासू :** हा मेल्यानों! ज्याच्या दृष्टीला सुख द्यायचं त्या नवऱ्यापुढं करा हवं तें. पण चार चौघांत हें बरं दिसतं का?

**जिजा :** अव,दिसतंय् तर काय झालं! ( रमाबाई येतात. ) या! अगदीं वक्ताला आलां. आई, या व. तुमास्नी दावूं का कशी दिसते रंगरोटी त्ये? या व रमाबाई हिकडं.

[ रमाबाईच्या गालावर पावडर उडवते. ]

**रमा :** हें काय? शी! मला नको बाई तें कांहीं!

**सासू :** अग, बघूं तर कसं दिसतं?

**रमा :** नको ग बाई मला! ज्याचं त्यानंच करावं तें. आमच्यासारख्यांनीं केलं तर लोक शेण घालतील तोंडांत.

**सासू :** अग, तुझं आतां हें असं झालंय् म्हणून. नवऱ्यानं विचारलं असतं तर तुलासुद्धां असलंच वैभव नसतं कां मिळालं?

**जिजा :** हां, न मिळाया काय झालं?

**रमा :** मिळालं असतं तेव्हां असतं. पण मिळालं तर नाहीं ना? अन् मिळण्याची आशा पण नाहीं या जन्मांत. आमची पावडर म्हणजे भाकरीचं पीठ अन् रूज म्हणजे तिखटाची भुकटी!

**जिजा :** ( खेळकरपणें ) नाहीं तर सासूनं गाल पिळला कीं होतीच आपली रंगरोटी! व्हय् कीं नाहीं?

**सासू :** ( हंसून ) कांहीं नाहीं. तुझंसुद्धां नशीब उघडेल एखाद्या वेळीं. मला तर कितीकदां वाटतं कीं करून केली ती असली सून कशाला केली कोण जाणे? त्यापेक्षां तुझ्यासारखीच समंजस पोरगी केली असती तर आज माझ्या रघूला किती तरी सुख लागलं असतं.

**रमा** : ( चमकून ) असलं कांहीं बोलूं नका हो. वहिनी का वाईट आहेत ?

**सासू** : कां नको बोलूं ? माझ्या मनांत खरंच येतं. आज नाहीं म्हटलं तरी सकाळीं उठल्यापासून चहापाणी, वाढणं, कपडालत्ता—सगळं रघूचं तूंच करतेस. काय या बायकोचा रघूला उपयोग ? या बायकांची म्हणजे नुसती शेजेची सोबत. अन् नवऱ्यांना माया लागते ती अगदीं या बारीक सारीक सुखांनींच लागते. तसं म्हटलं तर नवरा अन् लहान पोर सारखंच ! जें त्यांचं आस्थेनं करील त्यावर त्यांची माया.

**जिजा** : हां, ह्ये मात्र खरं आईसाब.

**रमा** : हें पहा, पण असलं कांहीं माझ्याजवळ बोलूं नका. बोलून चालून मी नोकर माणूस. आमची पगारी चाकरी.

**सासू** : पगारी कसली ? अग, याहून मायेनं कोण काय करतं आहे ? तूं पाहतेच आहेस ना ? पोरींचं काय नि रघूचं काय ? ( हळू ) रघूच्यासुद्धां नसेल का मनांत येत ?

**रमा** : आईसाहेब ? काय बोलतां हें ? असलं कांहीं बोललां कीं मला मोठं चमत्कारिक होतं.

**सासू** : अग, पण खरं आहे तें. ( हळू ) आतांशा आतांशा आला बाहेरून कीं चटकन् ' रमाबाई कुठं आहे ? ' म्हणूनच विचारतो ना ?

[ इतक्यांत—राया मी किती वाट दावूं
कोणा उकलून जीव माझा दावूं
रडूं कुठवर मी धाई धाई
जवळीं ग पति माझा नाहीं ! बाई नाहीं हो !
हें गाणें ऐकूं येतें. सासू आश्चर्यानें ऐकूं लागते. ]

**सासू** : अगोबाई, कोण हें ?

**जिजा** : बाईसाब.

**सासू** : सूनबाई ? रडताहेत का काय यजमान जवळ नाहींत म्हणून ?

**जिजा** : अव शिनेमातलं गाणं गात्याती.

**सासू** : म्हणजे ? ही सुद्धां सिनेमांतलीं गाणीं गाते का ?

**जिजा** : अन् दुलारीबाई नाचत्यात तवां पेटी वाजवत्यात की.

**सासू** : कोण दुलारी ? माझी नात ? नाचते ?

**रमा** : तुम्ही पाहिलं नाहीं अजून ? छान नाचते.

**सासू** : जा जा जिजा, बोलावून तरी आण तिला.

**जिजा** : आणतें हां. ( जाते. )

**सासू** : बाई, बाई, शहरांत बाई जें पहावं नि ऐकावं तें नवलाचं ! चार चार वर्सांचीं पोरं शिनेमांतलीं गाणीं गातात. आमच्या कोकणांत ? गांवढळ ग अगदीं पोरं ! शेंबूड सुद्धां नाहीं काढतां यायचा टोणग्यांना !

**रमा** : अन् त्या नाचाच्या क्लासला तर चार चार सहा वर्षांच्या पोरी जातात. किती छान नाचतात !

[ दुलारी येते. जिजाहि येते. ]

**दुलारी** : काय ग आजी ?

**सासू** : ( तिला जवळ ओढून ) काय ग ? तूं नाचतेस म्हणे छान. अन् तुझ्या आजीला नाहीं दाखवलंस नाचून ?

**दुलारी** : ( जरा चोरटें लाजून ) आई म्हणाली, आजी आहे तोंवर नाचायचं नाहीं.

**सासू** : कां ग बाई ? सगळं गांव जिथं नाचतंय्, तिथं तूं माझी नात नाचलीस तर मला कौतुकच नाहीं का ? हं नाच. नाच बरं.

**दुलारी** : इश्श, आजी, असं नाहीं कांहीं नाचतां येत.

**सासू** : मग ?

**जिजा** : पायांत घुंगरं हवीं.

**दुलारी** : अन् तबला, अन् कपडे.

**सासू** : म्हणजे, नाचायचे कपडे सुद्धां का निराळे असतात ?

**दुलारी** : हो, मी आतां आणतें बघ. आई, आई—

[ दुलारी पळत आंत जाते. दुसऱ्या बाजूनें कला आणि जानकीबाई येतात. ]

**सासू** : या या. नातीचा नाच पहायला बसलें आहें.

**जानकी** : म्हणजे ? दुलारी नाचते का ?

**कला** : हो, फार छान नाचते. तुमच्या संस्थेला मदत म्हणून नाचायचा प्रोग्रॅम करा. हजार रुपये मिळतील.

**जानकी** : खरंच, ही गोष्ट मात्र फारच चांगली सुचवली तुम्ही.

**कला** : अहो, सुचवली म्हणजे कां तें माहीत आहे का ?

**जानकी** : कां ?

**कला** : कुठं कांहीं पाहिलं तरी तुमच्या डोक्यांत त्याचा संस्थेला फायदा कसा होईल हा एकच विचार असतो.

**जानकी** : अगदीं बरोबर बोललां. माझा जन्म मी या संस्थेसाठीं दिला आहे. मला कसं दुसरं सुचेल ?

**सासू** : कसलं संस्थान आहे तुमचं ?

**कला** : संस्थान नव्हे संस्था. इन्स्टिटयूशन.

**सासू** : म्हणजे ? कांहीं संस्थानासारखं आहे वाटतं.

**कला** : ( कपाळावर हात मारून ) सांगा जानकीबाई.

**जानकी** : खरंच, आमचं संस्थान नाहीं, पण देवस्थान आहे. पवित्र ठिकाण तें देवस्थानच नाहीं का ? आमचं कार्य खरंच पवित्र आहे. ज्या बायकांना कोणाचा आधार नाहीं अशा देवाचा आधार शोधणाऱ्या बायकांना आमच्या या देवस्थानांत आम्ही आसरा देतों.

**कला** : चांगलं आहे तुमचं देवस्थान. अहो केतकीच्या सासूबाई, मी सांगतें तुम्हांला. जगांतून ओवाळून टाकलेलं पाप फक्त यांच्या देवस्थानांत असतं. नवऱ्यांनीं टाकलेल्या, सावळा गोंधळ करून तोंड काळं झालेल्या असल्या बायका यांच्या संस्थेंत असतात.

**जानकी** : तुम्ही कसंहि बोललां तरी मला राग यायचा नाहीं. बायकांच्या-साठीं संस्था काढणाऱ्या सगळया मोठ्या मोठ्या माणसांना लोक वाटेल ते बोलत आले आहेत आजपर्यंत. त्यांनीं कांहीं लोक नांवं ठेवतात म्हणून कार्य बंद केलं नाहीं ना ? कर्वे घ्या, देवधर घ्या,—अहो, सेवासदन, हिंगण्याचा आश्रम काढून या लोकांनीं हजारों बायकांना अन्नाला लावलं. पण त्यांना· सुद्धां लोकांनीं नाहीं नाहीं तें बोलून घेतलंच ना ? त्यांचंच कशाला ? महात्मा गांधींनीं आश्रम काढला, तर त्या आश्रमाकडेहि कावीळ झाल्याप्रमाणें पहाणारे लोक आहेतच ना ? आमच्यासारख्यांनीं रागावून चालणार नाहीं. आत्तां परवां तुम्ही येथून रागावून गेलांत ! मीच चार खेपा तुमच्याकडे घातल्या ना ?

**कला** : हं, हें मात्र खरं. तुमच्यांतला हा गुण माझ्या नेहमीं लक्षांत येतो. पण तुमचं अनाथ महिलांच्या बाबतींत चाललेलं काम मला पसंत नाहीं.

**जानकी** : कां बरं ?

**कला** : लग्न झालेल्या निराश्रित बायकांच्यासाठीं आश्रम काढून अन् त्यांना पोसून समाजाचा हा प्रश्न बिलकूल सुटणार नाहीं.

**जानकी** : मग तुम्ही काय सुचवतां ?

**कला** : अहो, सत्याग्रह हवा. टाकलेल्या बायकांना कायदा लग्नाची परवानगी देत नाहीं ना ? शंभर बायकांनीं सत्याग्रह करून लग्नं केलीं पाहिजेत.

**जानकी** : अहो, बोलणं सोपं आहे. करणं कठीण आहे. विधवांनीं लग्न लावायला सुरवात केली, तेव्हां समाजानं आग कशी पाखडली तुम्हाला माहीत आहे ना ? अजूनसुद्धां पुनर्विवाहित जोडप्यांच्या मुलांचीं लग्नं लावायला कठीण जातं. तुम्हाला वाटतं, शंभर बायका. मी म्हणतें, दहा बायकांना तुम्ही लग्नाला तयार करा पाहूं.

**कला** : माझ्याकडे लागलं तें. मी दहा बायका तयार करतें.

**जानकी** : अन् त्यांच्याशीं लग्न लावणारे दहा नवरे आणा. अन् सत्याग्रह केला कीं पुढल्या शिक्षेची तयारी हवी.

**कला** : कबूल.

**जानकी** : अहो, कबूल काय ? इतकं करूनहि तें लग्न व्हायचं नाहीं. म्हणजे लग्न करून सुद्धां ठेवलेल्या बायकांचाच दर्जा त्यांना मिळायचा, हें मात्र सांगायला विसरूं नका हं.

**कला** : कबूल. सत्य पदरांत पडेपर्यंत सत्याग्रह करायचा. अर्थात् सगळ्या परिणामाला तयारी हवीच. मी तुम्हांला महिन्यांत तयारी करून दाखवितें.

**जानकी** : ( डोळे मिचकावून ) बरं झालं. मी अशाच करारी बायकांची वाट पहात आहें. भराभर असे सत्याग्रह झाले कीं, समाज खळबळून जागा होईल अन् विचार करायला लागेल. मग, कायदा बदलायला किती उशीर हो ?

[ आंत दुलारी झुम झुम पाय वाजवते. ]

**सासू** : अग बाई, किती छान दिसते !

**जानकी** : वाः ! तिच्या आईला बोलाव कीं जरा.

**दुलारी** : ( आंतूनच ) आई येते आहे ना. कपडे बदलते आहे जरा.

**सासू** : घरांतल्या घरांत कशाला कपडे बदलायला हवे.

**कला** : अहो, ही पद्धतच आहे मोठ्या माणसांकडे.

**सासू** : काय मेलं! सगळा वेळ ते कपडे करण्यांत. काय म्हणे, अमुक साडी

असली कीं अमुकच पोलका पाहिजे. अमुकच रंगाच्या चपला हव्यात. कुंकूंसुद्धां निराळं.

**कला** : अहो, तुम्ही पाहिलं नाहीं अजून, मोटारीसुद्धां निरनिराळ्या रंगाच्या असतात.

**सासू** : पण नवरा तोच असतो ना ? का नवरेसुद्धां निरनिराळे ?

[ सगळ्या हंसतात. केतकी येते. दुलारी एकदम नाचतच येते. ]

**कला** : वा. एन्ट्री तर मोठी छान केली हं !

[ दुलारी नाचते. सगळ्या मधून मधून ' वा ! छान ! ' म्हणतात. नाच संपतो.]

**जानकी** : अगदीं विजेसारखी नाचते हं.

**केतकी** : तरी आतांशा संवय मोडली आहे जरा.

**कला** : प्रत्येक इंचाइंचाला शरीर वाकतंयसं वाटतं. नाहीं ?

**सासू** : मला तर वाटलं, जशी काय कापसाची केली आहे !

**केतकी** : खरंच. व्यायाम कसला भलता होतो नाचण्यांनं.

**कला** : अगदीं बिलकुल शेंगेसारखी दिसते.

**सासू** : मग तूं कां नाहीं ग नाचत ? इतकीं जीं मेलीं खंडीभर औषधं घेतेस अन् अंग रगडून घेत असतेस, त्यापेक्षां नाहीं का बरं ? खुश्शाल नाचावं सारा दिवस.

**दुलारी** : आई शिकत होती ना माझ्याजवळ.

**सासू** : हो ना ? चांगलं झालं कीं मग. ( केतकी डोळे वटारते. ) बाकी सगळं आहेच. तेवढंच राहिलं होतं.

**केतकी** : हो नाचणारच आहें मुळीं मी. दुलारीला तेवढ्याकरतांच शिकवलं आहे. म्हणजे घरच्या घरीं बरं.

**दुलारी** : ती नाचायला लागली ना, तेव्हां मास्तरसुद्धां हंसायला लागले.

[ सगळ्या हंसतात. ]

**सासू** : हो, बरोबरच आहे. एवढं उडतपगडं हलायचं अस्सं अस्सं !

**जानकीबाई** : खरंच केतकीबाई, आम्ही करतों दुलारीचा नाच संस्थेसाठीं पुढल्या पंधरवड्यांत.

**सासू** : अन् आमच्या सूनबाईचासुद्धां करा. म्हणजे लोकांची करमणूक छान होईल !

**केतकी** : मी जातेंच कशी. हीं कुचकीं नासकीं बोलणीं होऊं द्या तुमचीं पुरीं. ( जायला उठते. )

**सासू** : मला तरी काय करायचं आहे बोलून ? पण हें कांहीं ठीक नाहीं. एकादे दिवशीं ही मुलीला सिनमांतमुद्धां घालील. अन् स्वतः जाईल.

**केतकी** : हो तसंच करणार आहें. ( जाते. )

**जानकी** : पण तुमच्या दोघींच्या भांडणांत आमचा प्रोग्रॅम राहिला की !

**कला** : जानकीबाई, आतां तुम्ही चला माझ्याबरोबर. माणसाचं मन पाहून विचारायला हवं ना ? ही वेळ बरी नाहीं. चला तुम्ही आतां.

**जानकी** : चला बाई.

[ कला आणि जानकीबाई जातात. ]

**दुलारी** : आजी, मी पण जातें बाई. कपडे बदलून टाकतें.

[ दुलारी जाते. केतकी घाईघाईनें येते. ]

**केतकी** : जिजा, जिजा, ( जिजा येते. ) माझा हार तुला सांपडला का झाडतांना ?

**जिजा** : नाई बा ! अन् कवा ?

**केतकी** : तेंच तर आठवत नाहीं.

**जिजा** : आपुन तर पायला बी नाय. तुमी रोज घालीत व्हता त्यो ?

**केतकी** : नाहीं ग. या लुगड्यावर म्हणून मी तो लाल खडे बसवलेला हार नसे का घालीत ?

**जिजा** : त्यो ? हिथं पान व्हतं त्यो ?

**केतकी** : वेडपट कुठली ! अग, तो फासाचा, मी हिरव्या साडीवर घालीत असं तो लाल खड्याचा. नाहीं आठवत ?

**जिजा** : आतां मला बघा आठवलं ! मी जवां कवां बघत्यें तवां आणूनशानी देत्ये.

[ रमाबाई येतात. ]

**केतकी** : हां. आतां आठवलं. रमाबाई, तुम्हांला मी त्या दिवशीं कपाटाला कुलूप लावायला सांगितलं नाहीं ?

**रमा** : हो. पण मी कांहींसुद्धां पाहिलं नाहीं कपाटांतलं. तुम्ही गेलां तेव्हां तसंच मी कपाट लावलं नि किल्ल्या ठेवल्या. तुम्ही आलां, तशीं लगेच दिल्या तुमच्याजवळ.

**केतकी** : आश्चर्यच आहे !

**सासू** : आश्चर्य कसलं ? नीट ठेवला नसशील !

**केतकी** : तुम्हाला म्हणजे तेवढंच बोलायची संधि मिळाली मला.

**सासू** : मला काय करायचं आहे ? आणखी सगळं घरदार का लुटून नेईना कुणी !

[ केतकीची सासू जाते. ]

**केतकी** : नेऊं दे. पाहीन माझं मी. बरं, जिजा, झाडतांना नीट लक्ष ठेवीत जा.

**जिजा** : पन आपलं आपण जपूनशानी ठेवीत जा बया. नाहींतर आमा गरिबांच्या गळ्याला फांस.

**रमा** : मीसुद्धां त्या दिवशीं म्हटलंच कीं, ही जबाबदारी नको माझ्यावर म्हणून.

**केतकी** : जबाबदारी कसली ? आतां २४ तास घरांत राहाणारं माणूस म्हटलं कीं, थोडी जबाबदारी पण येतेच घरच्या माणसासारखी.

**रमा** : तें खरं. पण ही जबाबदारी अशी आहे कीं, नीट नाहीं पार पाडतां आली, तर आम्हांला विकूनसुद्धां पैसे देतां येणार नाहींत.

**केतकी** : असं कोण तुमच्याजवळ पैसे मागणार आहे उगीचच ?

**रमा** : पण आमच्यासारख्या गरिबांवर हें संकट नसावंच हें बरं. अहो, भीति वाटते.

**केतकी** : कर नाहीं त्याला डर नाहीं.

**रमा** : आतां तो हार सांपडेपर्यंत मलाच चैन पडायचं नाहीं हो ! मी नको म्हटलं तरी कपाट तुम्ही उघडं टाकून गेलां.

[ हें सर्व भाषण होत असतां प्रत्येकजण आपल्या परीनें धुंडाळून पहात असते. ]

**केतकी** : इतके दिवस झाले, आतां कसला सापडतोय् ? कुणी नेला असेल तो नेवो.

**जिजा** : मला वाटतं, साहेबांच्या खोलींत असेल.

**केतकी** : जा पाहूं रमाबाई, जरा बघा.

**रमा** : पण साहेब अजून बाहेर गेले नाहींत.

**केतकी** : मग, काय झालं न जायला ? एरवीं नाहीं का छप्पन्न वेळां जात नि गप्पा मारीत ?

**रमा** : काय म्हणतां ? मी साहेबांच्या खोलींत छप्पन्न वेळां जातें ? अन् गप्पा मारतें ?

**केतकी** : रमाबाई, मला सगळं कांहीं कळतं. तुम्हांला यांनीं अन् सासूबाईनीं अलीकडे डोक्यावर घेऊन ठेवलंय्.

**रमा** : हें पहा, असलीं कुभांडं मात्र मला मुळींच खपणार नाहींत.

**केतकी** : कसलीं कुभांडं ? साहेबांचे कपडे द्यायला छप्पन वेळां जात नाहीं तुम्हीं ? तुम्ही, सासूबाई अन् हे गप्पा मारीत बसत नाहीं ?

**रमा** : माझ्या कर्मा ! बाईसाहेब, काय बोलतां हें ?

**केतकी** : उगीच नाटक नका करूं. जिजा, तूंच म्हणत होतीस ना मला ?

**जिजा** : ए माझ्या कपाळा ! अन् मला कशापायीं या भांडणांत पाडताय ? मी जात्ये कशी.

**रमा** : मला वाटलंच होतं हें असं होणार म्हणून. तुमचं घरांत लक्ष नाहीं, अन् जेव्हां तेव्हां तुम्ही साहेबांच्यापुढं मला जायला सांगतां अन् वर हें बोलतां ?

**केतकी** : काय बोललें हो मी तुम्हांला ? तुम्ही बाई अन् मी बाई. मला तुम्ही विचारलं आहे का कधीं वकिलाकडे जायचंय् मला, अन् पोटगी मागायचीय म्हणून ? पण यांना मात्र तुमचं सगळं माहीत. खोटं बोलूं नका. तुम्हीच यांना वकिलाकडे सल्ला घ्यायला पाठवलंत कीं नाहीं ? सरवटे वकिलांची बायको मला सांगत होती.

**रमा** : कमाल झाली ! कोण काय म्हणेल अन् काय नाहीं. अहो, मी कशाला त्यांना पाठवूं. तुमच्याच सासूबाई जेवतांना सगळं सांगत बसल्या होत्या. म्हणत होत्या कीं, हिला पोटगी मिळवून द्यायची व्यवस्था कर म्हणून. मी अक्षरसुद्धां बोललें नाहीं. विचारा हवं तर सासूबाईंना तुमच्या.

**केतकी** : काय विचारायचंय् सासूबाईंना ? तुम्ही नि त्या सारख्या कानाला लागलेल्या असतां एकमेकींच्या. मला कळत नाहीं असं समजतां कीं काय ?

**रमा** : आतां मी तुमच्या घरीं नोकर म्हणून राहणार. जें कुणी जसं

बोलायला येईल तसं मला बोलायलाच लागतं. मी कबूल करतें. पण परमेश्वर साक्ष आहे, मी अजून माझं इमान सोडलं नाहीं अन् मर्यादा सोडली नाहीं ! आणि इतःपर तुम्हांला तसं वाटत असेल तर मी पाहतें दुसरीकडे काम.

**केतकी** : तें तर आहेच हो. आजकाल जें तें सापासारखं उरफाटत असतं. कुणावर उपकार केले कीं ते अपकारानंच फिटायचे !

**रमा** : अपकारानं म्हणजे काय ? तुम्ही जर भलभलते आरोप माझ्यावर केलेत तर मी कसं ऐकून घेईन ? आधींच तुम्हां नवराबायकोच्या भांडणांत आम्हां नोकरांना चिमटे बसतात. त्यांतून हें असं बोललां माझ्याबद्दल, म्हणजे काळं तोंड व्हायला उशीर नाहीं लागायचा ! तुम्ही आपली दुसरी बाई पहा कामाला. ( जाते. )

**केतकी** : ( अस्वस्थपणें कांहीं वेळ हिंडत ) रमाबाई, रमाबाई, ( रमाबाई डोळे पुशीत येते. केतकी अस्वस्थपणें इकडे तिकडे हिंडते. उभी राहते. परत हिंडते. पायानें जमीन खरवडीत रहाते. शेवटीं केतकी तिच्याजवळ जाते. ) रमाबाई, तुम्ही जाऊं नका. माझं डोकं अलीकडे ठिकाणावर नाहीं म्हणून मी चिडून बोललें तुम्हांला. एक महिना झाला, माझ्याजवळ ते अक्षरसुद्धां बोलत नाहींत. तुम्ही पाहिलंच असेल. ते असतील तिथें गेलें तर उठून जातात. घरीं आले तर सगळ्यांशीं हंसून खेळून बोलतात, अन् मी गेलें म्हणजे खोलीचं दार लावून घेतात. इतकं माझं दर्शन नकोसं झालंय् त्यांना. मी लठ्ठ आणि दिसायला साधारण आहें फार, म्हणून त्यांना आवडत नाहीं. पण मी तरी काय करणार ? ( डोळ्यांतून गळणारे थेंब पुसते. ) बरं, जा तुम्ही कामाला, रागावूं नका. मी तुम्हांला उगीच बोललें.

[ रमाबाई खालीं मान घालून उभ्या असतात, त्या तशाच घरांत जातात. जिजा येते. चमकून उभी राहते. रमाबाई गेल्यावर खुर्चीवर पाठीवर डोकें टेकून केतकी रडत असते. ]

**जिजा** : ( हलकेच ) बाईसाब. ( केतकी कांहींच बोलत नाहीं. थोड्या वेळानं ) बाईसाब !

**केतकी** : काय ग ?

**जिजा** : सुनंदाबाई आल्याती.

**केतकी** : कोण ? सुनंदा ? तिला सांग बाई नाहींत घरांत.

[ इतक्यांत सुनंदा आंत येते. ]

**सुनंदा** : वाः ! बाईसाहेब घरांत नाहींत ? हें केव्हांपासून शिकलीस ? अन् हें काय ? ( एकदम जवळ जाऊन ) केतकी, केतकी, काय झालं ग ? काय झालं ग जिजा ?

**जिजा** : ( हळूच ) गळ्यांतला हार हरवला जनुं.

**सुनंदा** : हात्तिच्या ! अन् त्याकरतां येवढं ? अग तो नाहीं, दुसरा मिळेल !. एवढं मेलं कपाट भरलं आहे. पडला एखादा कमी तुझ्यासारखीला तर काय व्हायचंय बरं ? जा ग जिजा तूं जरा. ( जिजा जाते. ) केतकी, काय झालं ग ?

**केतकी** : सुनंदा, माझ्या लहपणावर कांहीं उपाय सांग !

**सुनंदा** : अग पण काय झालं एवढं केतकी ?

**केतकी** : यांना मी आवडत नाहींशी झालें आहें.

**सुनंदा** : हो, मी तेंच विचारणार होतें. हें रमाबाईचं काय प्रकरण आहे ?
[ केतकी सरसावून बसते.]

**केतकी** : तूं काय ऐकलंस ग ? कसलं प्रकरण ?

**सुनंदा** : आतां जिथं गांव बोलतंय सगळं, तिथं तूं मला फसवतेस ? माझ्यापासून चोरून ठेवतेस ?

**केतकी** : तसं कांहीं नाहीं ग.

**सुनंदा** : बरं नको सांगूं. रमाबाई स्वतःच्या नवऱ्यापासून पोटगी मागताहेत, अन् तिकडे रमाबाईंचे यजमान अन् सासू म्हणत आहेत कीं, दुसऱ्याजवळ जाऊन राहून बिघडलेल्या बायकोला कसली पोटगी द्यायची ? मला काय माहीत नाहीं होय हें ? तूं किती दिवस लपवशील ?

**केतकी** : शपथ, मला कांहीं माहीत नाहीं ! पण दुसऱ्याजवळ म्हणजे कोणाजवळ ?

**सुनंदा** : अग, तुझ्या नवऱ्याजवळ ! सगळं गांव ओरडतं आहे, केतकीबाईचं अन् नवऱ्याचं पटत नाहीं म्हणून. अन् रमाबाईचं अन् तुझ्या यजमानांचं मेतकूट तर लोकांच्या तोंडाचा विषय झाला आहे.

**केतकी** : वाटलंच होतं मला अलीकडे, पण पुरावा मिळत नव्हता सुनंदा.

**सुनंदा** : अग, या गोष्टीचा पुरावा कसा मिळेल ? तूं बाहेर गेलीस म्हणजे काय चाळे चालतात तें तुला कसं कळणार ? तें तुझ्या जिजाला विचार.

**केतकी** : जिजाच्या बोलण्यांत मला नेहमीं संशय यायचा बघ असा कांहीं तरी !

[ जिजा धांवत येते. ]

**जिजा** : ( हळूच ) बाईसाब ! रमाबाई साहेबास्नी कांहींतरी सांगित्याती जनुं.

[ केतकी धांवत आंत जाते. सुनंदा इकडे तिकडे हिंडते. संतापलेल्या केतकीचा आवाज ऐकूं येतो. ]

**केतकी** : चालत्या व्हा माझ्या घरांतून. मी हजार जणांच्या तोंडून ऐकत होतें, आज डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलं.

[ रमाबाई चेवानं बाहेर येतात. मागोमाग केतकीहि. ]

**रमाबाई** : काय पाहिलंत ? काय पाहिलंत तें तरी सांगा !

**केतकी** : ( सगळ्यांकडे पाहून ) अहो, यांना कोणी विचारीत नव्हतं, तेव्हां मी आसरा दिला. अन् या माझ्या घरांत राहून माझ्याविरुद्ध यजमानांकडे कागाळी करायला जाणार ! आहे कीं नाहीं न्याय ? ही आपल्या नवऱ्याकडे नीट नांदली नाहीं. अन् आतां दुसऱ्याच्या नवऱ्याचे हात धरून जाणार आहे.

**रमाबाई** : खबरदार ! तोंडाला येईल तें बोलायला शरम वाटली पाहिजे तुम्हाला !

**सुनंदा** : अग, पण झालं काय ? केलं काय यांनीं ?

**केतकी** : काय केलं म्हणजे ? मी यांच्यावर विश्वास टाकला. संकटांत होत्या तेव्हां सहानुभूति दाखविली. तर माझ्या घरीं वस्तूंच्याच नाहीं तर माणसांच्या चोऱ्या करायला लागल्या !

**रमा** : काय ? चोरलं ? हें बोलतां वर आणखी ?

**केतकी** : माझा हार तुम्ही घेतला.

**रमा** : काय बोलतां ? गरीब झालों म्हणून आम्हांला चाड नाहीं असं वाटतं कीं काय तुम्हांला ?

**केतकी** : मला सगळं कळतं. तुम्ही माझा हार पांच दिवसांखालीं गळयांत घालून बसलां होतां. जिजा मला सांगत होती. खोटं बोलूं नका.

**रमा** : कोणचा हार ? अग बाई ! तो ?

**केतकी** : (वेडावत) हो. अगदीं खरंच वाटेल कुणाला तुम्हांला माहीत नाहीं हें !

**रमा** : [ कपाळावर हात मारून ] अहो, तो हार तुमच्या सासूबाईंनीं माझ्या गळयांत घातला. तुमचा हरवलेला हार तो, हें मला माहीतसुद्धां नाहीं. सासू-

बाईनीं हार माझ्या गळयांत घातला अन् म्हणाल्या, 'हा हार जरा असूं दे तुझ्या गळयांत. माझाच आहे.' विचारा हवं तर सासूबाईंना.

**केतकी** : सासूबाई, सासूबाई, इकडे या पाहूं.

[ केतकीची सासू घाईनें प्रवेश करते. ]

**सासू** : काय ग ? कसला ओरडा ?

**केतकी** : तुम्ही रमाबाईंच्या जवळ हार दिला होता ?

**सासू** : नाहीं बाई, मला कांहीं आठवत नाहीं ! ( स्वगत ) खरंच, रघू अन् रमा यांची खरंच कांहीं भानगड आहे कीं काय ? सूनबाईंना वठणीवर आणतां आणतां माझ्याच अंगाशीं प्रकरण यायला लागलं.

**रमा** : ( आर्जवानें ) काय हो हें ! तुम्हीच ना मला म्हणालां, सूनबाईंचा हार पलंगाखालीं मला सांपडला म्हणून ?

**सासू** : मला नाहीं बाई आठवत ! (एकीकडे) आतां या रमाबाईवर सारं उलवटवलं तरच रमाबाईच्या जिवावर चाललेला अन् भडकलेला संसार ठिकाणावर येईल. रमाचं मात्र नुकसान होईल. पण इलाज नाहीं !

**रमा** : नशिबा ! घर फिरलं कीं घराचे वासे पण फिरतात ! तुम्ही माझं सामान तपासून पहा हवं तर. मी कुठं घराच्या बाहेर तर जात नाहीं ना ?

**केतकी** : अगदीं बरोबर बोललांत. जिजा, आण ती ट्रंक.

[जिजा ट्रंक आणते. ]

**रमा** : पहा, खुशाल पहा. त्या ट्रंकेला कुलूपसुद्धां नसतं. मीच दाखवतें उघडून.

[ स्वतःच सामान काढूं लागते. तिनें उचललेल्या कपड्यांतून हार खालीं पडतो. घाबरून. ]

**रमा** : देवा !

**केतकी** : ( विजयानें सगळीकडे पहात ) झालं ? ( रमा गुडध्यावर कपाळ टेकते. ) हा हार घालून त्यांना भुलवणार होतां वाटतं ?

**सुनंदा** : हें असंच असतं. या असल्या बायकांना सहानुभूति दाखविली कीं, ती उरफाटी गळयांत यायची !

**केतकी** : उरफाटी म्हणजे काय ? आपण इकडे सहानुभूति म्हणून यांना जवळ करतों. अन् तिकडे पुरुषांना यांच्याबद्दल सहानुभूति वाटायला लागली कीं त्यांना ते अगदीं फारच जवळ करायला लागतात.

**सुनंदा** : अन् असल्या बायका काय ? हपापलेल्याच असतात ! कुणी एक हात पुढं केला कीं या अगदीं गळीं पडायच्या !

**रमा** : ( डोकें उचलून ) बोला ! तुम्हांला तोंड दिलीं आहेत. काय वाटेल तें बोलून घ्या ! तुमची जातच तसली आहे. माझ्यासारखीच्या नाहीं नाहीं तें अंगीं चिकटवलंत. देव पाहून घेईल !

**केतकी** : अहो जा. अशा छप्पन पाहिल्या तुमच्यासारख्या !

**रमा** : छप्पन नुसत्या पाहिल्या आहांत. त्या छप्पन्नांपैकीं तुम्ही एक व्हाल अन् हिंडाल बरं ! (केतकीच्या सासूकडे पाहून) फार फार उपकार केलेत माझ्यावर ! सूनबाईचं वाटोळं करायला निघाला होतां ना ? बाजू तुमच्या अंगावर आली तेव्हां माझ्यासारख्या गरिबाचा बळी दिलात. फार उपकार झाले ! ( जाते. )

**केतकी** : झालं ? फार रमाबाई, रमाबाई करत होतां ! आपल्या मुलाच्या संसारावर निखारा ठेवायला बघत होतां नाहीं ?

**सासू** : आतां मला तरी काय माहीत ही बाई अशी आहे म्हणून ?

[ पडदा पडतो. ]

# ४

[ १ ]

रस्ता. रमाबाईची सासू मथुराबाई केतकीबरोबर बोलत येते.

**मथुरा** : मी तुम्हाला म्हटलं तर त्या दिवशीं तुम्हीं रागावलां, पण ती त्या लायकीची बाईच नाहीं. तुम्हांला अनुभव आला म्हणून बरं झालं.

**केतकी** : आतां अगदीं कानाला खडा. यापुढं चोवीस तास स्वयंपाकाची बाई ठेवायची नाहीं. ठेवलीच तर ती तरुण ठेवणार नाहीं !

**मथुरा** : कसं बरं बोललां ? अहो, या बायका स्वतः उठायच्या नि दुसऱ्याला उठवायच्या संसारांतून. अन् तुम्हांला सांगतें, असल्या बायकांना पुढें करून ती बाई आज मिरवणूक काढणार. काय लोकांना सहानुभूति वाटणार आहे ? सांगा मला.

**केतकी** : अहो, कसली आली आहे सहानुभूति. आतां आमच्यासारख्यां-कडेच पहा. आम्ही काय सहानुभूति म्हणून का जातों ? आपली गंमत म्हणून

जायचं. कोण कोण बायका एवढ्या लग्नाला तयार झाल्या आहेत, हें पाह्यला जायचं !

**मथुरा** : कां हो? म्हणे दहा जण पुरुष पण लग्नाला तयार झाले आहेत!

**केतकी** : हो का ?

**मथुरा** : हो बाई. आतां वाटेंतच ऐकलं, त्या दहा बायका अन् हे दहा पुरुष म्हणे हातांत हात घालून जाणार आहेत.

**केतकी** : खरं ?

**मथुरा** : आमच्या रमाबाईनं पण कुणी गांठला कीं काय ?

**केतकी** : नसेल बहुतेक अजून. नुकत्याच निघाल्या आहेत आमच्या घरनं. पण एक सांगतें कीं, या बाई सुद्धां कांहीं राह्यच्या नाहींत. मोठ्या गोडव्या आहेत. पोटांत शिरतील अन् पोट फाडून बाहेर येतील !

**मथुरा** : पहा तर. अन् आतां तुम्हीच सांगा, यांना पोटगी कशी द्यायची? त्या जानकीबाई सारख्या घरीं येतात अन् माझ्या मुलाला उपदेश करीत असतात. एकदां तर रमाबाईला घेऊन आल्या होत्या. माझ्या मुलानं साफ सांगितलं, तुमच्या वयाकडे बघून तुमचा मान ठेवतों, पण तिला आणून असला तमाशा करणार असलां तर माझ्या घरीं येऊं नका म्हणून.

**केतकी** : अहो, आतां कोण करतंय् पोटगीची फिर्याद ? उगीच आमच्या घरचा आधार मिळाला त्यांना, त्याच्या जिवावर निघाल्या, होत्या फिर्याद करायला. अन् आमच्या सासूबाईंची त्यांत भर.

**मथुरा** : तुमच्या सासूबाईंना तरी पहा नसता उद्योग !

**केतकी** : तें कांहीं विचारूं नका. ही हाराची भानगड सांगितली ना तुम्हांला ? दुलारीनंच मला सांगितलं कीं, आजीनं हार ठेवला रमाबाईंच्या ट्रंकेंत. तें मात्र माझ्या मनाला लागून राह्यलं आहे. मी आतां त्याकरतांच जानकीबाईंकडेच जाणार आहें. त्यांनीं मला लिहिलं होतं कीं, खरंच रमाबाईंनीं हार चोरला होता कीं काय म्हणून.

**मथुरा** : अहो, होय म्हणावं नि सोडून द्यावं. तुम्ही तरी आतां कशाला एवढं तिचं काळ्याचं पांढरं करायला चाललां ?

**केतकी** : असं नाहीं, तिच्यावर असले आरोप घेणं बरं नाहीं. उगीच एकाद्याला अन्नावरून उठवा कशाला ? संभाळणार असतील जानकीबाई त्यांना संस्थेंत, तर संभाळूं दे.

**मथुरा** : म्हणजे ? आतां ती शिकायला संस्थेंत रहाणार आहे कीं काय ?

**केतकी** : जानकीबाई म्हणजे अशी बाई आहे कीं, रस्त्यावरच्या लुळयापांगळयालासुद्धां उचलून आणून त्याचं करीत बसेल. मग रमाबाई म्हणजे तर काय ?

[ पडद्यांतून गर्दीचा आवाज. ]

**मथुरा** : मिरवणूक निघणार आहे ती कोणत्या रस्त्यानं ?

**केतकी** : ती काय ? ती गर्दी जाते आहे ना, त्या दिशेनेंच जा. आम्ही येतोंच तिकडे म्हणा.

[ दोघी जातात. कलाताई एका बाजूनें व दुसऱ्या बाजूनें जिजा येते. कलेच्या हातांत सायकल. ]

**कला** : बरं झालं तूं भेटलीस. अग, रमाबाईंना निरोप सांग माझा.

**जिजा** : काय म्हणून ?

**कला** : म्हणावं, नवऱ्यांनीं टाकलेल्या बायकांची मिरवणूक आहे आज दुपारीं, तर तुम्ही पण या ?

**जिजा** : दोपारीं ?

**कला** : हं. मुद्दाम दुपारची वेळ ठेवली आहे. या बायकांचं आयुष्य कसं तापल्या तव्यावरचं असतं हें दाखवण्यासाठीं मुद्दाम दुपारची वेळ घेतली !

**जिजा** : अव, पन आधींच तापल्या तव्यावर त्या करपत्यात अन् उन्हाचं आणखी कशाला करपाया लावतां ?

**कला** : तूं चूप बस पाहूं. रमाबाईंना निरोप सांग माझा. केतकीबाई रजा देतील त्यांना आजच्या दिवस.

**जिजा** : केतकीबाईंनीं त्यांना कायमचीच रजा दिली नव का ?

**कला** : म्हणजे ?

**जिजा** : अव, त्या रमाबाईंना केतकीबाईंनीं काढून टाकलं कामावरून.

**कला** : कां ?

**जिजा** : आज केतकीबाईकडे बायकांची नुसती रीघ लागलीया. जें येतं तें विचारतं–काय झालं, काय झालं ? अखेरीला केतकीबाईच्या नवऱ्याची केतकीबाईच्या तोंडूनच इतकी बदनामी झालीया कीं, साहेबांनीं आतां एवढा त्यो कुत्रा नाहीं का बांधलेला असतो, त्योच अंगणांत मोकळा सोडूनश्यानी दिलाय. त्यो कुत्रा इचारायला जाईल त्याचं जनुं नरडं धरतोया ! ( एकीकडे ) आतां जायची नाहीं बया. अव, या बायका तरी कसल्या असल्या ! कुणी

जन्माला आलं तरी बी बाजेच्या शेगडीखालीं चाय करूनशानी पितील, अन् कुनि म्येलं, तरी त्याच्या चितेवर बी चाय करूनशानी पितील. मर ना तिकडे ती केतकीबाई अन् तिचा नवरा अन् ती रमाबाई. पण नाहीं. यांना चैन पडायचं नाहीं बातम्या काढल्याबिगर. सगळ्या मोऱ्यांचं पानी प्याया धावत्याती.

**कला :** ( स्वगत ) बरं, मग काय करावं बरं ? रमाबाईकडेच जावं. तिलाच गांठावं हें बरं. मिरवणुकीला अजून दोन तास अवकाश आहे.

[ सुनंदा येते. ]

**सुनंदा :** अहो, सायकल घेऊन कुठं निघालां गर्दीनं ?

**कला :** आज ती आमची मिरवणूक आहे ना ?

**सुनंदा :** हो खरंच, आज अगदीं आधींच लोक रस्त्यावर बसून राहिले आहेत.

**कला :** खरं कीं काय ?

**सुनंदा :** मी तिकडेच चाललें होतें. आज तुम्हांला आणखी एक बाई मिळतील मिरवणुकीला हव्या तर.

**कला :** कोण कोण ? सांगा तरी. अहो, मी सांगितलं आहे पुष्कळ बायकांना—जी ती 'हो' म्हणते, पण आयत्या वेळेला कोण कोण येताहेत कोणाला माहीत ! तुम्ही कोणच्या बाई म्हणत होतां ?

**सुनंदा :** केतकीबाईंकडली रमाबाई.

**कला :** हो. आतांच ही जिजा सांगत होती मला.

**जिजा :** सुनंदाबाई, मला एक पाटी लिहूनशानी द्या ना.

**कला :** कां ? तूं येतेस का काय मिरवणुकीला ?

**जिजा :** हां, मी येत्ये ! माझं नाहीं पटलं नवऱ्याशीं तर सोडूनशानी देईन, अन् दुसरा म्होतुर करीन. अशी मिरवणूक नाइ काढणार. द्या की लिवून जरा.

**सुनंदा :** काय लिहून देऊं ?

**जिजा :** असं द्या कीं, 'नवरा नि हार चोरला.' 'केतकीबाईच्या स्वयंपाकिनीनं केतकीबाईचा नवरा नि हार चोरला.'

**सुनंदा :** ( हंसून ) अस्सं होय ?

**जिजा :** ( कुचेष्टेनें ) अव, सकाळपासून ज्याला त्याला सांगून सांगून तोंड दुखायला लागलं. त्यापरि गळ्यांत पाटी अटकावून हिंडल्ये तरी बरं व्हईल. म्येलीं

लोकं पहा! 'सकाळ' पत्र वाचत्यात अन् एक दोन आनं देत्यात, मला कुनी पैसा बी देईना, मी इतकं सांगत्यें तरी–अग बया, रमाबाईची सासू आली जनू.

**सुनंदा** : आतां तूं कांहीं बोलूं नको बरं का ?

[ रमाबाईची सासू–मथुराबाई–येते. ]

**मथुरा** : कां हो, मिरवणूक पहायला नाहीं का जायचं ?

**सुनंदा** : तिकडेच निघालें.

**मथुरा** : मग चला कीं. अहो, मी आज मुद्दाम जाणार आहें. आमची रमाबाई त्या मिरवणुकींत आहे कीं काय मला पहायचंय्.

**कला** : मग ? असली तर बिघडलं कुठें ? तुमचा मुलगा तर तिला संभाळीत नाहीं ना ? मग दुसरं लग्न करण्यासाठीं मिरवणुकींत आली तर कुठं बिघडलं ?

**मथुरा** : तुम्हांला काय हो ? ज्याचं जातं, त्याला कळतं. स्वयंपाकाला आपल्या नवऱ्याच्या मित्राकडे राहिली अन् आम्हांला कमीपणा आला.

**कला** : त्यांत कसला आलाय् कमीपणा ? तुम्ही खायलाहि देत नाहीं बिचारीला. तिकडे आई गरीब, ती पण संभाळीत नाहीं. बरं, शिक्षण नाहीं. ती तरी काय करील दुसरं ?

**मथुरा** : अहो, पण सगळीं म्हणणारच ना अमक्या अमक्याची बायको तमक्याकडे स्वयंपाकाला राहिली म्हणून ? म्हंजे कमीपणाच ना नवऱ्यांना ? मी म्हणतें करा. स्वयंपाक करा, धुणं धुवा, आणखी कांहीं करा, पण याच गांवांत कशाला ? सारा देश मोकळा पडलाय् कीं.

**कला** : मग एवढा कमीपणा वाटतोय् तर तुम्ही त्या नवऱ्यालाच सांगा कीं दुसरीकडे जा म्हणून.

**मथुरा** : तर तर ! या तुमच्यासारख्या चंवढाळ बायकाच आणखी नाहीं नाहीं तें शिकवतात. आज ती कोण एक जण निघालीच आहे ना शोभा करायला सगळ्यांची ? काय म्हणे, दुसऱ्या लग्नाला तयार असलेल्या बायकांची मिरवणूक ! मेल्यांना लाजा वाटत नाहींत, नवरे जिवंत असतांना दुसऱ्या नवऱ्याच्या गोष्टी करायला !

**कला** : पण त्यांचे नवरे असून मेल्यासारखेच असतात.

**सुनंदा** : कां हो ? एकदां ती सून आपली नाहीं म्हटल्यावर तुम्ही कां हो इतक्या जळजळतां ?

**मथुरा** : अहो, कां म्हणून काय विचारतां ? या बायका म्हणजे नवऱ्याची बदनामी करीत हिंडणाऱ्या चालत्या बोलत्या जाहिराती. अहो, तोडून टाकलं तरी तुटत नाहीं.

**कला** : म्हणूनच म्हणतें, त्यांचीं दुसरीं लग्नं झालीं कीं तुटेल. एवढ्यासाठींच आम्ही मिरवणूक काढणार आहों.

**मथुरा** : तुम्ही ? तुम्हीच वाटतं मिरवणूक काढणार आहां ?

**कला** : हो. मीच काढणार आहें बरं ?

**मथुरा** : मग आमची सूनबाई असेल त्यांत ?

**कला** : मला कशाला विचारतां ? तुम्ही येणार आहां ना बघायला ? दिसेलच असली तर.

**मथुरा** : मला गेलंच पाहिजे. आज दिसूं दे तर खरी, मुलाला सांगून कायमचा बंदोबस्त करतें.

[ मथुराबाई जाते. ]

**सुनंदा** : अहो, थांबा थांबा कीं जरा. मी पण आलें कीं.

[ सुनंदाहि जाते. ]

**कला** : जिजा, मला रमाबाईचं घर दाखव. तिच्या सासूची सगळी बडबड तिला सांगतें, म्हणजे चेवून ती मिरवणुकीला येईल.

**जिजा** : चला, मी घर दावत्ये तुम्हांला.

[ कला व जिजा जातात. रमाची आई अन् रमाबाई दुसऱ्या बाजूनें बोलत येतात. ]

**आई** : माझं तोंड काळं केलंस. आतां माझ्या घरीं येऊन बसलीस तर कोण पोशील तुला ? तुझा नवरा ?

**रमा** : आई, माझा नवरा मला पोशीत असता, तर सगळीकडे माझं स्वागत करायला सगळ्यांचीं दारं मोकळीं असतीं. नवऱ्यानं दाराबाहेर टाकलं म्हणून सगळीजणं दारांत उभे राहून मला खडे मारणार, हें मी ओळखून आहें. तुझ्या घरां येऊन मी तुला संकट घालत नाहीं.

**आई** : नको बाई. माझं मलाच पुरे पुरे झालंय. तुला एक चार पैसे दे म्हटलं तर तुटून पडत असस. अन् आतां ?

**रमा** : पुन्हां पुन्हां तें कशाला काढतेस ? आज मी खोली पाहिली आहे. काम पण मिळालं आहे दुसरं.

**आई** : आतां तरी जपून रहा. चार घरचीं कामं सुटलीं तुझीं, आतां जें घर धरशील तिथें कायम रहायचं अशा हिशेबानं रहा.

**रमा** : मी आपण होऊन का काम सोडतें आहें ? जाऊं दे. माझं आयुष्य मलाच जगलं पाहिजे. मनुष्य जन्माला येतो तो एकटाच, अन् मरतो तो एकटाच. मधल्या आयुष्यांत तो आधार शोधायला धडपडत असतो, पण बुडणाराला तोही आधार कुणी देत नाहीं !

[ कला दुसऱ्या बाजूनें येते. ]

**कला** : अगबाई, तुम्ही बऱ्या भेटलांत. अहो, तुमच्या आईच्या घरीं जाऊन आलें. तिथें कुणी सांगितलं कीं, तुम्ही निराळी खोली घेऊन रहातां म्हणून. म्हणून तिकडे पत्ता काढून गेलें, तों कळलं कीं, तुम्हांला बिऱ्हाड खालीं करा म्हणून सांगितलं. शेवटीं परत निघालें होतें जायला. बरं, येणार ना ?

**रमा** : कुठें ?

**कला** : त्या मिरवणुकीला.

**रमा** : तुम्ही आमच्या दुर्दैवाची चेष्टा करायचं ठरवलं आहे का ?

**कला** : वा ! असं कसं म्हणतां ? तुमच्या दैवाला हात देण्यासाठींच तर चाललं आहे सगळं. नाहींतर मला काय करायचे आहेत हे उपद्व्याप ? पण असं आहे रमाबाई, कुणी कुणाचं चांगलं करायला गेलं, तरीसुद्धां विश्वास येत नाहीं आजकाल.

**रमा** : ( आवेशानें ) हो, काय म्हणून विश्वास यावा ? चांगलं करायला जातात, ते चांगलं करायला जाण्यापेक्षां स्वतःच्या चांगुलपणाची जाहिरात व्हावी म्हणून निघतात चांगलं करायला ! तुम्हांला माझं चांगलं करायचं आहे ना ? तुमच्या मैत्रिणीनं माझ्या तोंडाला काळं फासलं आहे तें धूवून द्यायला सांगा, म्हणजे माझं भलं होईल. ( अर्धवट स्वतःशी ) कुठून त्या घरीं जायचा मला मोह झाला कुणाला माहीत ! अहो, मला अफू खायला लावायची वेळ आणली आहे त्या बाईनं !

**कला** : असं कसं म्हणतां ? तिला आधार असल्याशिवाय तर ती नाहीं ना खवळली ?

**रमा** : ( रागानें ) काय आधार होता त्यांना ? केतकीबाईंचा हार त्यांच्या सासूनं माझ्या पेटींत ठेवला.

**कला** : हें म्हणण्यांत काय अर्थ आहे ?

**रमा** : ( रागानें ) काय अर्थ आहे म्हणजे काय ? ती कोकणची म्हातारी जितकी साधी दिसते, तितकी आहे असं वाटतं ? आपल्या सुनेला संसारांतून उठवण्यासाठीं तिनं माझा बळी दिला. आपल्या मुलाची सारा वेळ माझ्याजवळ स्तुति करायची, आणि मुलासमोर माझी स्तुति करायची. केतकीबाईचं घरांत कितपत लक्ष होतं सगळ्यांना माहीत आहे. घरांत सगळं कांहीं मीच करायची. हजार वेळां त्या सासूनं मला बोलून दाखवलं कीं, रघूला तुझ्यासारखी बायको असती तर बरं झालं असतं ! म्हातारी माझ्याजवळ जिथें असं बोलली, तिथें मुलाजवळ असं बोलल्याखेरीज राहिली असेल ? अहो, मी झालें तरी माणूस आहें, अन् केतकीबाईचा नवरा तरी माणूसच आहे. मनावर अशाच तऱ्हेचे आघात करीत राहणारी ती सासूच आम्हां दोघांच्या मनांत नाहीं नाहीं ते विचार आणायला कारण झाली. ही का तिची माझ्याबद्दल सहानुभूति ? अहो, ही सहानुभूती अन् कुंटणखाना चालविणाऱ्या बाईची सहानुभूति यांत काय फरक आहे ? कितीक बायकांचा सत्यनाश अशा मानभावी सहानुभूतीनं आजपर्यंत झाला असेल. मी त्या म्हातारडीपेक्षां वयानं लहान, अनुभवानं लहान. तिनं माझं रक्षण करायचं, का असं करायचं ? माझं राहूं दे. पण आपल्या मुलाचं शील राखण्यासाठीं तरी असले कपटी खेळ खेळायचे नव्हते !

**कला** : तुम्ही केतकीबाईना हें सांगितलं कां नाहीं ?

**रमा** : अन् त्यांनीं त्यावर विश्वास ठेवला असतां होय ? ( खिन्नपणें ) त्या घरांत मला दिवस काढायचे होते ! माझ्यासारखी तापल्या वाळवंटांत तडफडणारी बाई कुठं कुणी मायेचे शब्द बोललं कीं तिथं विसावणारच. सासूच्या मायेच्या शब्दांनीं माझं मन नाहीं त्या गोष्टींचा विचार करूं लागलं. पण पुन्हां मीच सावध होई. ( स्वतःच्या मनापुढें चित्र आणीत ) एक दिवस साहेबांचं डोकं दुखत होतं. ते जेवायला बसले होते. मी कधींही त्यांच्याजवळ आपण होऊन बोललें नव्हतें. त्या दिवशीं मी त्यांना जेवतांना विचारलं, ‘ हें काय ? आज जेवायला नको ? डोकं दुखतंय ? ’ हें मी विचारायचाच अवकाश, साहेबांनीं माझ्या पुढें केलेल्या हातावरच हात ठेवला अन् ‘ रमा ’ म्हणून म्हटलं. ( आर्जवानें ) माझ्या चित्ताची किती चलबिचल झाली असेल सांगा ! तुम्हीं नवऱ्याच्या बायका आहांत. जिला आईचं, बापाचं, नवऱ्याचं कुण्णाकुण्णाचं सुख नाहीं, तिच्या मनाची निस्सहायपणें उच्चारलेल्या त्या शब्दांनीं काय स्थिति झाली असेल ? कळेल का तुम्हांला ? नाहीं. तुम्हांला कुण्णाला कळायचं नाहीं. उलट मी हें ज्यांना सांगेन, तीं

असंच म्हणणार कीं, ही बाईच वाईट. पिकलं म्हणून विकलं. मला मन आहे, आणि तें त्या सासूच्या कपटाला बळी पडलं, हें कोण पाहाणार ? कलाताई, जगांत बायका–पुरुष पापं करीत असतील, पण त्यालासुद्धां कारणांची परंपरा असते. जगाला तीं कारणं पहाण्याला सवड नसते. मग चुकलेलं माणूस सहानुभूति नाहीं कुणाची म्हणून आणखीच चुका करीत जातं. बाकी जाऊं दे. तुम्हाला तरी सांगून काय करायचं हें ? तुमची आमची जात निराळी आहे. पण तुम्हीं मिरवणूका काढून या टाकलेल्या बायकांना जगजाहीरपणें आणखी डागळणार आहां. कोणी त्यांच्याकडे सहानुभूतीनें पाहाणार नाहीं. नुसती टिंगल करतील त्यांची आणि ओढवले नसले त्याच्यावर प्रसंग तर ते मात्र ओढवतील !

**कला** : खरं आहे तुमचं म्हणणं, पण तुमच्याचसारख्या सगळ्या बायका असतील असं म्हणतां नाहीं येणार ?

**आई** : ( व्याकुळ होऊन ) अहो, चांगल्या मनाचा मक्ता का दिलेला असतो ? सगळ्या चांगल्याच असतात. प्रसंगानं वाईट होतात माणसं. आज माझ्या पोरीनं इतकं सांगितलं तुमच्यापुढें. माझ्या मनाची मुद्धां कालवाकालव झाली. प्रसंग असा आहे दरिद्रानें आणलेला कीं, पोरीला पोर म्हणून जवळ करायला मन धजावत नाहीं. आज जर मी हिला घरीं ठेवली, तर आधींच जग तिला नावं ठेवतं, तिच्याबरोबर माझ्या लग्नाच्या पोरींनाही नांवं ठेवायला लागेल !

**रमा** : बरोबर आहे तुझं. जगाची भीति दरिद्री माणसानांच. म्हणूनच मी तुझ्या घरीं आलें नाहीं आणि येणार नाहीं. पेटत्या मशालीनं दरिद्री घरांत राहून काय उपयोग ? ती आढ्यासकट सगळ्यांना जाळून टाकील !

**कला** : मग तुम्हीं नाहीं येत ?

**रमा** : ( निक्षून ) नाहीं, आणि मी तुम्हांला सांगतें, तुमच्या मिरवणुकीला कोणतीही बाई येणार नाहीं. ( जाते. )

**आई** : या केतकीबाईमुळें माझ्या मुलीचं वाटोळं झालं. पोटगी मिळवून घरीं स्वस्थ बसायचं म्हणून तिनं ठरवलं. पण वकिलाकडे गेली, तर वकील म्हणाला, 'तुम्ही आचरणानं धड नाहीं असं सिद्ध करून नवरा पोटगी नाकारूं शकेल.'

**कला** : झालं, म्हणजे बिचारीला सगळ्या बाजूनीं कोंडमारा !

**आई** : अहो, कोंडमारा म्हणजे काय विचारतां ? उद्यां अर्ज केला समजा,

आणि केतकीबाईंचीच साक्ष काढली, तर ती काय रमाला चांगलं म्हणणार आहे ? म्हणजे कोर्टात आणखी छीः थू व्हायची. अन् ती रमाची सासू तर अगदीं ब्रह्महत्येसारखी मागं लागली आहे हात धुवून. आतां बिचारी काम करून पोट भरते, पण ही आपली कागाळया करून हिला कुठं टिकूं देत नाहीं. काय म्हणावं आतां ? आतां एके ठिकाणीं लागली आहे पुन्हां. बघूं या किती दिवस काम टिकतंयू तें.

[ दोघी जातात. दुसऱ्या बाजूनें रमाबाई आणि एक बाई येतात. बाई छचोर असतात. ]

**बाई** : एवढा सगळा गांव लोटला आहे आज त्या मिरवणुकीला अन् तुम्ही कशा नाहीं गेलां ?

**रमा** : आधीं पोट कसं भरावं ही विवंचना पडली आहे मला, तर दुसरा नवरा करतां यावा म्हणून नाचायला वेळ कुठं आहे ?

**बाई** : काय हो रमाबाई, पोटाची पंचाईत, पोटाची पंचाईत ! जेव्हां भेटतां तेव्हां पोटाची पंचाईत म्हणून म्हणतां !

**रमा** : मग, खोटं सांगतें आहे ?

**बाई** : खोटं नाहीं हो. पण माणसानं आलेल्या घडीला तोंड द्यायला शिकायला हवं.

**रमा** : तें कसं काय ?

**बाई** : अहो, दुसरा नवरा करायचा तो तरी पोटाची ग्वळगी भरावी म्हणूनच.

**रमा** : हो, तें एक आहेच. अन् दुसरं, जगणाऱ्या प्राण्याला सगळ्या प्राण्यांसारख्या उपाधि असतातच मनाच्या.

**बाई** : हो तेंहि खरंच. टाकलेल्या बायकांना नवऱ्याचंही सुख हवं अन् पोटही भरायला पाहिजेच. आतां मिळत नाहीं तें हें तर खरं ना ? कुणी कांहीं म्हटलं तरी या गोष्टी मिळवून देतां येत नाहींत. मग का असंच 'भूक' 'भूक' करीत मरायचं ?

**रमा** : हो, मग काय करणार ! कुणी माणसं, 'भूक' 'भूक' करून मरण्यासाठींच जन्माला येतात ?

**बाई** : वेड्या आहांत झालं.

**रमा** : मग तुम्हीं काय कराल ?

**बाई** : अहो, मीच कशाला ? करील त्याला मार्ग सुचेल.

**रमा** : कळूं द्या तर ?

**बाई** : कांहीं नाहीं. खुशाल एकाद्या पुरुषाजवळ रहावं. लग्न जर करतां येत नाहीं तर मग करायचं काय ?

**रमा** : ( रागानें ) खबरदार असलं कांहीं मजजवळ बोलाल तर !

**बाई** : अहो, रागावतां काय एवढ्या ? जें उघड कोणी घेऊं देत नाहीं, तें चोरूनच मिळवलं पाहिजे.

**रमा** : तुम्हांला मी किती दिवस पहातें आहे. मला कल्पना नव्हती तुमची.

[ रमाबाई क्रुद्धपणें पाहूं लागते. ]

**बाई** : कल्पना कां नव्हती ? अहो पोट भरायचे मार्ग बंद झालेले. बाईला कुणाजवळ राहून जर पोटाला मिळत असलं, तर तिनं आपल्या भरल्या मापाला लाथ कां लावावी ? ( हळूच ) तुम्ही त्या केतकीबाईंच्याच नवऱ्याजवळ मुकाट्यानं राहायचं. कश्शाला वाण पडली नसती.

**रमा** : ( चिडून ) पुन्हां माझ्याशीं शब्द बोलूं नका. तुम्ही असली नरकाची शिकवण देत असाल ही कल्पना नव्हती ! ( जाते. )

**बाई** : ( हंसत ) काय सीता सावित्रीचा आव आणते आहे ! उद्यां सगळ्या गांवांत थारा नाहीं मिळाला कीं. येशील माझ्याच रस्त्याला. ( जाते. )

## [ २ ]

रात्रीचा अंधार. जानकीबाई आपल्या घरीं झोंपल्या आहेत. इतक्यांत दार ठोठावल्याचा आवाज येतो. ]

**जानकीबाई** : कोण आहे ? ( उत्तर येत नाहीं. ) कोण आहे ? ( उत्तर नाहीं. ) कोण आहे बाई ? ( " मी " असा आवाज येतो. ) इतक्या रात्रींचं कोण ? ( दार उघडते, निरखून पहाते. ) कोण ? रमाबाई ? ( रमाबाई एकदम पुढें येऊन जानकी-

बाईचे पाय धरते. ) रमा, ऊठ. काय झालं ? ( रमा उठते. ) काय झालं बाळ ? ( रमाबाईला जवळ घेते. तिच्या पाठीवर हात ठेवते. ) अं, काय झालं ?

**रमा :** (गदगदून) मी काय करूं ? मला कांहीं सुचत नाहीं. सगळीकडे काम पाहिलं, कोणी ठेऊन घेत नाहीं ! मी कोण आहें ? ( आवेगानें ) मी चोर आहें कां हो ? दरोडेखोर आहें का ? वेश्या आहें का ? ( स्फुंदत राहते.) कां माझा छळ मांडला आहे देवानं ?

**जानकी :** ( कनवाळूपणानें ) बाळ, काय झालं ? कोण म्हणतो तुला चोर ?

**रमा :** ( विवशपणें ) सगळीं, सगळीं. मोठ्यांच्या घरीं राहिलें. मला खोटं पाडलं. आईला सुद्धां खरं वाटेना. तिलासुद्धां वाटलं, आपली मुलगी धड नाहीं म्हणून. तिला सुद्धां वाटलं, तिच्या दुसऱ्या मुलींना माझ्यामुळं बट्टा येईल असं ! ( स्फुंदत राहते. हताशपणें ) हे दोन महिने कसे काढले हें माझं मला माहीत ! एक खोली घेऊन राहिलें अन् काम शोधायला लागलें. आधीं कामच लागेना. दोन दिवस ठेवीत, दुसऱ्या दिवशीं कुणाचं कांहीं ऐकत, अन् म्हणत, ' असली बाई नको आमच्याकडे. ' खोलीचं भाडं कुठून देणार ? काय खाणार ? पोराच्या पोटाला काय घालणार ? पोटगीच्या फिर्यादीचं सांगितलंच तुम्हांला काय झालं तें ! काय करूं आतां ? वेड लागल्यासारखं होतं. (उद्विग्नपणें) अब्रू. अब्रू. या अब्रूचं दडपण माझ्या मनावरून निघून जाईल तर बरं; म्हणजे राजरोस वाईट मार्गाला गेलेली बाई म्हणून माझं मन माझा छळ करणार नाहीं ! पण तें होत नाहीं माझ्या हातनं !

**जानकी :** असं बोलूं नये बाई.

**रमा :** (हताशपणें) मग काय करूं ?--मला एका घरीं ठेऊन घेतलं कामाला. मीच सांगितलं त्यांना-माझ्या नांवाचा असा बभ्रा झाला आहे. पण तुम्ही पारखून घ्या मला. दुसऱ्याचं ऐकूं नका. अन् ज्या दिवशीं माझ्यांत तुम्हांला कांहीं गैर दिसेल त्या दिवशीं चार खेटरं मारून मला घराबाहेर पाठवा.

**जानकी :** तिथून कां निघालीस ?

**रमा :** जानकीबाई, मला तुम्हीं आईच्या पलीकडे आहां ! मी अद्याप खोटं बोललें नाहीं. या उपर तुम्हांला काय वाटेल तें वाटो.

**जानकी :** सांग बाळ, मला काय करतां येईल तें मी करीन.

**रमा :** ( थोडा वेळ थांबून हताशपणें ) मी सरवस्यांकडे कामाला राहिलें. बाई नेहमीं डोळयांत तेल घालून असत. मला किती बरं वाटे. माझे खरे गुण तिथें

कळतील अन् मला लागलेला काळिमा जाईल. बाई हरतऱ्हेनं माझी परीक्षा घेत होती. आज सकाळीं त्यांनीं दिरासाठीं आंघोळीला पाणी काढायला सांगितलं. मी आंघोळीच्या खोलींत पाणी उपशीत होतें. तोंच त्यांच्या दिरानं आंघोळीच्या खोलींत येऊन दाराला कडी लावली. मी घाबरून ' बाई ! बाई !' करून ओरडलें. बाई धावत आल्या. अन् दिरानं सांगितलं, ' मी आंघोळीला आलों तर रमाबाई आंत लपून बसली होती ! ' आतां काय माझ्या नशिबाला करूं ? सांगा.

**जानकी :** जग हें असंच आहे. दिराला वाटलं असावं, बोलून चालून ही असली बाई; घेतला फायदा तर काय होणार आहे ?

**रमा :** मला आतां कुठं काम करायचं म्हटलं तर कांटा येतो अंगावर. इतक्या बायका काम करतात, माझ्याच नशीबीं कां हो हें सगळं ?

**जानकी :** अग, रूप हें बाईची शोभा आहे, तसंच तें शत्रु पण आहे ! रूप नसलं तरी निराधार बाईकडे गिधाडांच्या नजरा लागलेल्या असतात. मग रूप असल्यावर काय विचारायचं आहे !

**रमा :** मग आमच्यासारख्यांनीं दिवस तरी कसे काढावे ? मी नुसती वाड्यांत खोली घेऊन राहिलें होतें, तर एकटी बाई राहते म्हणून सगळ्यांच्या नजरा लागलेल्या असत. ही कुठं जाते, काय करते, कुणाशीं बोलते, काय बोलते ? कुणी माणूस झालं म्हणून काय झालं ? विषारी डंखच मारायचं ठरवलं सगळ्यांनीं, तर दगडाचासुद्धां चुरा होईल. मी माणूसच आहें ना ?

**जानकी :** हो माणूसच आहेस, अन् माणूसच राहायचं आहे हें विसरूं नकोस ! चुका सगळ्यांच्या हातून होतात. पण चुका पचवून बेरड व्हायला न शिकणं म्हणजेच माणुसकी. कळलं ?

**रमा :** नाहीं. ती माणुसकी गेली असती, तर मला कसलाच त्रास नसता राहिला अन् कसली ददाद राहिली नसती ! सगळं आकाश कोसळल्यासारखं दिसतं आहे, तरी माणूस म्हणून जगण्यासाठीं मी धडपडतें आहें. आतां तुम्हीं मला आसरा द्या.

**जानकी :** ( दृढतेनें ) बाळ, तुझ्या नवऱ्यानं आगाऊच नोटीस पाठवून तुला माझ्याकडे रहाण्याची बंदी केली आहे.

**रमा :** ( घाबरून ) काय म्हणतां ?

**जानकी :** हो. ' तुम्ही रमाला आश्रय दिला तर तिला फूस लाऊन भलत्या

मार्गाला लावण्याचा प्रयत्न केल्याबद्दल तुमच्यावर फिर्याद करीन.' असं त्यांनीं मला कळवून ठेवलं आहे. रमा, माझ्या संस्थेला अजून संस्थेचं रूप नाहीं. माझं आतडं तुटतं ग ! म्हणून मी माणसांना जमा करतें. भीक मागून त्यांच्या पोटाला घालतें. पण कायदा स्त्रीच्या बाजूनं नाहीं ना ! माझ्या-सारख्यांचे प्रयत्न वाळूंत घर बांधण्यासारखे असतात ! कशी मी तुला ठेऊन घेऊं ?

**रमा** : झालं ! शेवटचा आधार होता, तोही तुटला ! (थोडा वेळ निश्चल रहाते.) मला वाटलं होतं, इथें मला निवाऱ्याची जागा मिळेल. पण आतां मला निवारा नाहीं ! मी मेलें तर किती जिवांवर उपकार होतील ! त्यांना पुन्हां लग्न करतां येईल ! यासाठीं माझी पारध चालली आहे !

**जानकी** : हें पहा रमा, आज तूं आतां इथेंच निज. उद्यां गेलीस तरी चालेल.

**रमा** : (कांहींशा विचारानें एकदम उठून त्वेषानें) नाहीं. मी आतांच केतकी-बाईंच्या घरीं जातें. त्यांच्या नवऱ्याला सांगतें कीं, मी आजन्म पाप केलं नाहीं. तुम्हीं माझं मन चळवलं. तुम्हीं ज्या भावनेनं माझ्या हातावर हात ठेवला त्याच भावनेनं मला जवळ करा. मी तुमची ठेवलेली बाई म्हणून राहतें !

[ जाऊं लागते. जानकीबाई रमाला धरून ठेवतात. ]

**जानकी** : (मोठ्यानें) रमा ! रमा ! जायचं नाहीं. च्चूच्चू ! अशिक्षित, निराधार बायका इच्छा नसतांही वाईट मार्गाला कशा लागतात, हें आज मला कळलं ! (रमा हात हिसडून जाते) रमा ! रमा ! अजून विचार कर ! जाऊं नकोस. रमा !...गेली ! रमा गेली ! कितीक रमा अशाच भोंवऱ्यांत सांपडत असतील ! अज्ञान, दारिद्र्य, निष्टुर समाज, निष्टुर कायदा ! अरेरे ! हजारों वर्षं कितीक रमांचे बळी गेले ! समाजा ! या सगळ्या रमांना वांचविण्याची वेळ अजून आली नाहीं का ? हे सर्व मृत्यू उघड्या डोळ्यांनीं तूं पहाणार का ?

[ पडदा पडतो. ]

: मुद्रक :
**वि. पु. भागवत**
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४



: प्राप्तिस्थळ :
**ग. पां. परचुरे**
**प्रकाशन मन्दिर**
गोरेगांवकर चाळ २
गिरगांव, मुंबई ४



: प्रकाशक :
**जी. आर्. भटकळ**
पाप्युलर बुक डेपो
लॅमिंग्टन रोड, मुंबई ७

● ● ● नित्य बदलणाऱ्या **आर्थिक व** सामाजिक परिस्थितीमुळें **आधुनिक संसा**-रांत अनेक **नवे कूट प्रश्न उभे राहिले** आहेत. या नव्यांच्या **जोडीला शतनु**-शतकांच्या परंपरेनें **आलेले पुरातन संसार प्रश्न** आहेतच. **या** नव्याजुन्या **बिकट** प्रश्नचिन्हांपुढें **नव्यानें** संसाराला **लागलेलीं जोडपीं** गोंधळतात, भांबावतात, भेदरतात !

या सर्व संसारप्रश्नांची मनमोकळी **पण** सडेतोड चर्चा आपल्या '**अगदी घरगुती गप्पां**'त **दर बुधवारीं** '**मौज**' साप्ताहिकामधून **सौ. मालती बेडेकर** (बाळूताई खरे) **करीत** असतात. **त्या** खुसखुशीत, उद्‌बोधक **व** जिव्हाळ्याच्या साप्ताहिक चर्चा **तर** तुम्ही बिनचूक **वाचीत**च असणार **ना !** ● ● ●

मुखपृष्ठ : दलाल आर्ट स्टुडिओ, मुंबई